# दोन शब्द

आवडत्या गोष्टींतील ही सहावी गोष्ट. महान् साहित्यिक महर्षि टॉलस्टॉय यांच्या जगप्रसिद्ध "रिसरेक्शन" या कादंबरीची ही गोष्ट. ही गोष्ट मीं अनेक ठिकाणीं मुलांना, तरुणांना सांगितली आहे. टॉलस्टॉय म्हणायचे, "माझीं सारीं पुस्तकें फुकट. रिसरेक्शन खरें." इतकें त्यांना हें आवडे. साऱ्या समाजाचें येथें अन्तर्बाह्य दर्शन आहे. समाजांतील दंभ, खोटेपणा यांचें येथें विदारक दर्शन आहे. सरकार ही संस्था कशी यांत्रिक असते तें उत्कृष्टपणें येथें मांडलें आहे. जगांतील विषमता जावी म्हणून क्रान्तिकारकांच्या धडपडी येथें दाखवल्या आहेत. ज्यांना आपण गुन्हेगार म्हणतों ते गुन्हेगार नसून समाजरचनाच कशी जबाबदार आहे तें येथें जळजळीतपणें मांडलें आहे. ही कादंबरी म्हणजे महान् करुण काव्य आहे. या कादंबरींतील उत्कटता, भव्यता मी लहानसा प्राणी या छोट्या गोष्टींत कोठून बरें आणूं? तरीहि यथामति माझ्या नेहमींच्या पद्धतीनुसार ही गोष्ट मीं लिहून काढली आहे. दोन-तीन वर्षांपूर्वींच कांहीं भाग लिहिला होता. थोडा राहिला होता तो आज जोडून महर्षि टॉलस्टॉयना प्रणाम करून हे दोन शब्द संपवितों.

शारदाश्रम, बोर्डी
३०-६-४९

पां. स. साने
(सानेगुरुजी)

सानेगुरुजी यांनीं मुलांच्यासाठीं मुद्दाम लिहिलेल्या व मुंबई प्रांतिक दुय्यम शाळा-खात्यानें पुरवणी-वाचनासाठीं मंजूर केलेल्या



## पांच कादंबऱ्या

| | | | |
|---|---|---|---|
| १ दुर्दैवी | किंमत १॥॰ | नं. S. ६६ B. S. | १९४९ एल्. ४३२ |
| २ स्वर्गीय ठेवा | किंमत १॥॰ | नं. S. ६६ B. S. | १९४९ एल्. ४३१ |
| ३ मिरी | किंमत १॥॰ | नं. S. ६६ B. S. | १९४९ एल्. ४३० |
| ४ गोप्या | किंमत १।॰ | नं. S. ६६ B. S. | १९४९ एल्. ४२९ |
| ५ आपण सारे भाऊ | किंमत १।≈ | नं. S. ६६ B. S. | १९४९ एल्. ४२८ |



# १

शहरांतून माणसांनीं निसर्गाची जवळजवळ हकालपट्टी केलेली असते. जिकडे तिकडे फरसबंदी असते. कोठें झाडमाड उगवूं नये, हिरवें गवत दिसूं नये असें केलेलें असतें. दाट वनराजी कोठेंच नसते. सर्वत्र तो कारखान्यांतील चिमण्यांचा धूर. असें असलें तरीहि वसंत ऋतूचें वैभव तेथेंहि प्रभाव पाडल्याशिवाय राहात नाहीं. किती झालें तरी वसंत तो वसंत.

ती वासंतिक प्रभात वेळा होती. झाडें सुंदर दिसत होतीं. त्यांच्या त्या नूतन पल्लवांवर रमणीय सूर्यप्रकाश पडला होता. चिमण्या, कबुतरें, नाना पक्षी घरटीं तयार करण्यासाठीं आनंदानें श्रमत होते. सृष्टींत एक प्रकारचा निष्पाप आनंद भरून राहिला होता. झाडें, फुलें, पक्षी, लहान मुलें सर्वांनीं सभोंवतीं मधुरता पसरिली होती. परंतु वयांत आलेलीं माणसें काय करीत होतीं? तीं एकमेकांना फसवींत होतीं, छळीत होतीं. वास्तविक ईश्वरानें ही पृथ्वी आनंदासाठीं दिली. येथें प्रेम पिकवा, शान्तीनें, सुसंवादानें नांदा असें जणूं प्रभु सांगत आहे. परंतु मनुष्यप्राणी या सृष्टीचें नंदनवन करण्याऐवजीं जणूं स्मशान करतो. सर्वत्र लूटमार, पिळणूक, गुलामगिरी यांचेंच साम्राज्य दिसतें. मनुष्य कधीं सुधारणार?

तुरुंगांतील लोकांना वसंत ऋतु काय, शरद् ऋतु काय, सारें सारखेंच. तेथें तोच छळ, त्याच शिव्या, तीच अखंड मानहानि, त्याच अंधार-कोठड्या. तेथें वासंतिक वारा मोकळेपणानें कोठें फिरणार? ती पाहा अपराधी स्त्री-कैद्यांना ठेवायची जागा. त्या लहान लहान खोल्या! त्या एका खोलींतील एका स्त्री-कैद्याला खटल्यासाठीं आज कोर्टांत न्यायचें आहे. दुसरेहि दोन आरोपी आहेत. परंतु त्यांना दुसरीकडून नेण्यांत यायचें होतें.

अंधाऱ्या बोळांतून तुरुंगाधिकारी जेथें स्त्री-कैद्यांना ठेवण्यांत येत असे तेथें आला. तेथें कोंदट, कुजट हवा होती. घाण येत होती. तो अधिकारी करड्या कठोर आवाजांत म्हणाला, ' रूपा, तुला न्यायालयांत जायचें आहे. तयार हो. वेळ नको लावूं. '

औरत-कोठडीवरची नायकीण तेथें होतीच.

' लौकर आटप. मघांपासून सतरांदां सांगितलें तरी ऐकेल तर हराम. यांच्या गप्पा कधीं संपत नाहींत. लाजहि नाहीं मेलीला. आटप लौकर. ' ती गरजली.

त्या कोठडींत दहा-वीस स्त्रिया होत्या. नाना प्रकारच्या गुन्ह्यांसाठीं त्यांना शिक्षा झालेल्या होत्या. त्या कोठडींत उवा, डांस, ढेंकूण यांची साम्राज्यसत्ता होती. त्या कोठडींत पराकाष्ठेची दुर्गंधी होती. त्या फाटक्या चटया, त्या फाटक्या घोंगड्या, सारें ब्रह्मांड त्यांत होतें. आणि रूपा तेथें होती! तिनें केंस जरा नीटनेटके केले. पदर वगैरे जरा नीट घेतला. ती तयार झाली. नायकिणीनें कोठडीचा दरवाजा खोलला.

' चल हो बाहेर. ' ती ओरडली.

' रूपा, प्रश्न विचारतील तेवढ्यांचींच उत्तरें दे. अधिक बोलूं नकोस. जरूरीपेक्षां बोलण्यानें आपण अधिकच गुंतून जातों. मीं सांगितलेलें ध्यानांत ठेव. म्हणजे बरेंवाईट फारसें व्हायचें नाहीं. ' कोठडींतील एका बाईनें सल्ला दिला.

' आतां माझें काय व्हायचें राहिलें आहे? वाईटाची पराकाष्ठा झाली आहे. आणखी वाईट दुसरें काय आहे? मला कशाचीहि आतां आशा नाहीं. जीवनांतील सारें विष मीं पचविलें आहे. ' रूपा म्हणाली.



'अग एखादे वेळेस सुटशील. नाहीं तर आहेच जन्माचा तुरुंग.' कोठडींतील ती बाई बोलली.

'पुरे तुमचीं बोलणीं. मोठी आली सल्ला देणारी. बंद कर तोंड. नाहीं तर थोबाड फोडीन. हो आंत. कोठडी बंद करायची आहे.' ती नायकीण गरजली.

जेलरसाहेब निघाले. रूपाला घेऊन शिपाई निघाले. बोळाच्या दारापर्यंत ती औरत—कोठड्याची नायकीण त्यांच्या बरोबर गेली. सलाम करून ती परत कोठडीवर देखरेख करायला आली.

तुरुंगाच्या कचेरींतून सारी व्यवस्था झाल्यावर शिपायांच्या पहाऱ्यांत रूपा बाहेर पडली. ते हत्यारी शिपाई होते. आपण जबाबदारीचें कर्तव्य पार पाडीत आहोंत अशा ऐटीनें ते चालले होते. त्या दुर्दैवी स्त्री-कैद्याकडे रस्त्यांतून जाणारे येणारे पाहात होते. गाडीवाले, मजूर, हमाल, दुकानदार, कारकून सारे रूपाकडे बघत नि निघून जात. जणूं ती प्रदर्शनांतील वस्तु होती. होय! जगानें तिचें प्रदर्शनच मांडलें होतें. ती खिन्नपणें परंतु गंभीरपणें पावलें टाकीत जात होती.

'कांहीं तरी वाईट कर्म केलें असेल, शेण खाल्लें असेल. भोग म्हणावे कर्माचीं फळें.' तिच्याकडे पाहून कोणी म्हणे. शाळेंत जाणाऱ्या मुलीं-

मुलींचीहि रस्त्यांत गर्दी होती. दहा-साडेदहाची ती वेळ होती. रस्ते गजबजलेले होते. हत्यारी पोलीस पाहून मुलें जरा दुरूनच बघत. ही डाकीण आहे कीं काय, जादूटोणा करणारी आहे कीं काय, असें मुलांच्या मनांत येई. आपल्या अंगावर ती धांवून तर नाहीं ना येणार असेंहि लहान मुलांच्या मनांत येई. परंतु पोलीस आहेत, ती गडबड करणार नाहीं असा विश्वास वाटून तीं थांबत. तिच्याकडे बघत. तो पाहा एक शेतकरी. खेड्यांतलें धान्य घेऊन तो आला होता. तें विकून आलेल्या पैशांत दुसरे शहरी पदार्थ घ्यायला तो जात होता. त्याला त्या अभागिनीची कींव आली. त्यानें खिशांतून एक चवली काढून तिच्या हातावर ठेविली. दुःखी रूपा दुःखानें हंसली. ती लाजली. आपली अशी कींव केली जावी याचें तिला दुःख वाटलें. तिच्या डोळ्यांत पाणी चमकलें. परंतु तिनें अश्रू आवरले. कांहीं तरी ती पुटपुटली नि पुढें चालली. कोणी तिच्याकडे वांकड्या नजरेनेंहि बघत. जणूं तिचें सौंदर्य त्यांना मोह पाडीत होतें. तिला त्यामुळें बरें वाटे. तीहि त्यांच्याकडे प्रसन्न दृष्टीनें पाही. तिच्या तोंडावर आज जरा टवटवी दिसत होती. बाहेरची मोकळी हवा तिला मिळाली. बाहेरचें विशाल जग ब-याच दिवसांनीं आज पुन्हां तिनें पाहिलें. तिचें हृदय—कोमेजलेलें हृदय—जरा प्रफुल्लित झालें होतें. तें पाहा धान्याचें मोठें दुकान, आणि त्याच्यापुढें किती हीं कबुतरें, किती हे पारवे! त्यांना दाणे टाकण्यांत आले होते. माणसांची आबाळ झाली तरी चालेल; परंतु पशुपक्ष्यांची होतां कामा नये! रूपा जात होती. एका सुंदर कबुतराला तिचा पाय लागला. फडफड करीत तें उडालें. तिच्या कानापर्यंत तें उडालें. तिच्या डोक्याभोंवतीं फिरून आपल्या पंखांचा तिला वारा घालून तें पुन्हां खालीं आलें नि दाणे टिपूं लागलें. त्या कबुतराकडे पाहून तिच्या तोंडावर स्मित झळकलें. परंतु तिला स्वतःच्या स्थितीचें भान आलें आणि तें स्मित लगेच मावळलें. ती पुन्हां खिन्न झाली. तिची मुद्रा करुणगंभीर दिसूं लागली.



कोण ही रूपा? काय आहे तिची हकीगत? तिची आई एक मोलकरीण होती. एका खेडेगांवांत दोन श्रीमंत बहिणी राहात होत्या. त्यांचें एक मोठें शेत होतें. शेतावर दुग्धालय होतें. रूपाची आई तेथें कामाला असे. तिचें

लग्न झालें नव्हतें. परंतु तिला मधूनमधून मुलें होत. उपजलीं नाहींत तों ती मरत. तिचीं अशीं पांच मुलें मेलीं. आणि सहावी मुलगी ती ही रूपा. ती नक्षत्रासारखी होती. त्या श्रीमंत बहिणींतील एकीनें तिला पाळलें, पोसलें, वाढविलें. प्रथम रूपा आईजवळच होती. तिच्या आईचें गाईच्या गोठ्यांतच बाळंतपण झालें होतें. अंगावर दूध यावें म्हणून त्या श्रीमंत बहिणीनें रूपाच्या आईला थोडे पैसे दिले, पोटभर खायला सांगितलें. रूपा वाढली. तीन वर्षांची झाली, आणि तिची दुर्दैवी आई देवाघरीं गेली. त्या श्रीमंत बहिणीनें रूपाला आपल्या वाड्यांत आणिलें. तेथें ती वाढूं लागली. एक बहीण रूपाचे लाड करी, दुसरी बहीण तिला मारहाण करी. एक बहीण तिला लिहा-वाचायला शिकवी, इतर कलाकुसरीचें काम शिकवी. दुसरी बहीण तिला झाडलोट करायला, भांडीं घांसायला, कपडे धुवायला लावी. एक बहीण तिला नटवी, सजवी; दुसरी तिला शिव्या देई. अशा दुहेरी वातावरणांत रूपा वाढली. ती आतां मोठी झाली. ती घरांतील काम करी. भांडीं आरशासारखीं स्वच्छ घांशी. देवाची मनापासून भरपूर फुलांनीं पूजा करी. लिही, वाची, भरतकाम करी.

गांवांतील शेतकऱ्यांच्या तरुणांकडून—कामगारांच्या तरुणांकडून—तिला मागणी आली. तिच्या आईचें तें दारिद्र्यांतलें अनैतिक वर्तन सर्वांना माहीत होतें. परंतु रूपा जणूं देवता दिसे. तिच्या आईच्या हकीगती विसरून तरुण तिला वरायला तयार होते. परंतु गरिबांजवळ लग्न लावायला रूपाचें मन घेईना. तिला त्या श्रीमंत बहिणीकडे सुखाची संवय लागली होती. ऐष-आरामी जीवनाची चटक लागली होती. काबाडकष्टाचें, शेण गोळा करण्याचें जीवन आतां तिला नको वाटे. ती सर्वांना नकार देई.

ती सोळा वर्षांची झाली. निर्मल, निष्पाप सौंदर्याची ती पुतळी होती. आणि एके दिवशीं त्या बहिणीचा तरुण भाचा आला. तो पदवीधर होता. श्रीमंत होता. त्याचें तिच्यावर नि तिचें त्याच्यावर गोड प्रेम जडलें. परंतु तो लगेच गेला. जातांना दोघांचे डोळे भरून आले. दोन वर्षांनीं तो भाचा पुन्हां आला. परंतु पूर्वींचा निर्मळ, निष्पाप तरुण तो राहिला नव्हता. तो सुखविलासी, भोगी बनला होता. तो लष्करांत मोठा अधिकारी होणार होता. आणि लष्करांत लायक ठरावें म्हणून सामान्य नीति त्यानें कधींच

सोडली होती. तो धूम्रपान करी. मद्यपान करी. तो बाहेरख्यालीहि होऊं लागला होता. रूपाला त्यानें पाहिलें. बुभुक्षित डोळ्यांनीं पाहिलें. त्यानें शेवटीं तिला मोह पाडला. त्यानें तिला भोगलें. आणि त्याची दोन दिसांची रजा संपली. जातांना शंभर रुपयांची नोट त्यानें तिच्या हातांत कोंबली ! पांच महिन्यांनीं तिच्या लक्षांत आलें कीं, पोटांत बाळ वाढत आहे. ती सचिंत झाली. लाज कशी राखायची ? तो कोठें गेला ? त्या घरांत ती एके दिवशीं उद्धटपणानें वागली. तिला हांकलून देण्यांत आलें. आतां त्या बहिणी तिला काय म्हणून ठेवतील ? त्यांच्या भाच्याचें तें पाप त्या काय म्हणून घरांत राखतील ? रूपा निघून गेली. ती त्या एका मोठ्या शहरांत गेली. तिच्याजवळ ते शंभर रुपये होते. ती कोठें राहाणार ? एका पोलीस अंमलदाराकडे ती मोलकरीण म्हणून राहिली. परंतु पन्नास वर्षांचा तो अंमलदार तिला कां सोडील ? तो तिला सतावूं लागला. एकदां तर तो फारच रंगांत आला. तिनें त्याला संतापानें दूर लोटलें. ‘ पाजी, पापी सैतान ’ म्हणून तिनें त्याला लोटलें. तो दाणकन् पडला. ती तेथून निघून गेली. बाळंतपण आतां जवळ येत होतें. ती जवळच्या एका खेड्यांत गेली. तेथें एका सुइणीकडे ती बाळंत झाली. तिचें बाळ आजारी पडलें. त्याला दवाखान्यांत ठेवण्यांत आले. तेथें तें मेलें ! संपला संसार ! ती पुन्हां शहरांत आली. जवळचे सारे पैसे संपले होते. ती बेकार होती. निराधार होती. जंगलखात्यांतील एका गार्डाकडे ती राहिली. काम करण्यासाठीं म्हणून राहिली. तो गार्ड विवाहित होता तरीहि तो रूपाला त्रास देऊं लागला. तो गोडबोल्या होता, कारस्थानी होता, हुशार होता. शेवटीं त्यानें तिच्याशीं व्यभिचार केलाच. त्याच्या बायकोनें त्या दोघांना एकान्तांत पाहिलें. तिनें रूपाला बदडलें. तिला तेथून हांकलून देण्यांत आलें. ती आपल्या मामाकडे गेली. तो बुकबाइंडर होता. तो दारुड्या होता. त्याची बायको धोबीकाम करी. रूपा तिला मदत करूं लागली. परंतु फारच कष्ट तेथें पडत. ती रडकुंडीस येई. शेजारीं एक विद्यार्थी राहात होता. तो हिला छळूं लागला. त्याची आई रूपाला शिव्या देई व म्हणे, ‘ तू चहाटळ आहेस. तूं छिनाल आहेस. तूं माझ्या बाळ्याला मोह पाडतेस, तूं डोळे मिचकावतेस, थेर करतेस. लाज नाहीं वाटत ? ’ ती तेथून गेली. एका ग्रंथकारानें तिच्यावर प्रेम केलें. परंतु

तिला त्याचा तिटकारा येई. एका दुकानदारावर रूपाचें प्रेम बसलें. त्यानेंहि तिच्याजवळ लग्न लावायचें कबूल केलें. परंतु त्यानें शेवटीं हातावर तुरीच दिल्या. ती एकटी राहिली. एके दिवशीं पोलीस तिला म्हणाले, ' सरकारी परवानगी काढ नि दुकान थाट. वेश्याव्यवसाय सुरू कर. मोठमोठे तुझ्याकडे लाळ घोटीत येतील.' ती विचार करूं लागली. तिला आतां अनेक संवयी जडल्या होत्या. ती दारूहि पिई, सिगारेट ओढी. दुःख विसरण्यासाठीं ती दारू पिऊं लागली तिला स्वस्थितीची लाज वाटे, दुःख होई. विसरायला एकच दारूचा उपाय होता !

रूपाच्या समोर आतां दोनच मार्ग होते. एक मार्ग म्हणजे मोलमजुरी करायची, काबाडकष्ट करायचे. आणि तिची आई गुप्तपणें चोरटे भोग भोगी तसे मिळाले तर भोगायचे. दुसरा मार्ग उघड सुखाचा होता. तेथें काबाडकष्ट नव्हते. सुखाचा सनदशीर राजरोस मार्ग. तिला कोणी म्हणत, ' हाच मार्ग घे. कशाचा तोटा पडणार नाहीं. तुला हवें तें घेतां येईल. वस्त्रें, भूषणें सारें कांहीं. ' आणि एके दिवशीं ती वेश्यागारांत गेली. तिचें तें पतित जीवन सुरू झालें. मानवजातीविरुद्ध, ईश्वराविरुद्ध बंड म्हणून जणूं तिनें तो मार्ग उचलला. समाज हें जीवन सहन करतो तरी कसे ? सरकारनेंहि तें कायदेशीर ठरविलें आहे. सरकारला प्रजेच्या सुखाची किती काळजी ! डॉक्टरांनीं वेश्यांना मधूनमधून तपासायचें. निरोगी म्हणून प्रशस्तिपत्रें द्यायचीं ! आणि या दुर्दैवी स्त्रियांतील दहांपैकीं नऊजणी शेवटीं वाईट रोगांना बळी पडतात. त्यांना अकालीं वार्धक्य येतें. काय तें जीवन ! दिवसा तीन प्रहरपर्यंत झोंप काढायची आणि रात्रभर जागरण. तिसरे प्रहरीं उठावें. तोंडाला पॉवडरी लावाव्या. खिडक्यांतून डोकावत बसावें. केंसांना, अंगाला सुगंधी तेलें लावायचीं ! सतरांदां आरशांत बघायचें. ओठांना रंगवायचें. ते तलम झिरझिरीत पोषाख. दिव्यांचा लखलखाट. आणि मग माणसांची जा ये सुरू होते. गाणें-बजावणें चालतें. सारे तेथें लाळ घोटीत येतात. व्यापारी, कारकून, पुजारी, हिंदु, मुसलमान, खिस्ती, ज्यू, सारे तेथें लालसावलेले येत असतात. श्रीमंत येतात, गरीब येतात; हाडकुळे येतात, लठ्ठ भारती येतात; आजारी येतात, धट्टेकट्टे येतात; सुरूप येतात, कुरूप येतात; विवाहित येतात; अविवाहित

येतात; विद्वान् येतात, अविद्वान् येतात; दारुड्ये येतात नि बिनदारुड्ये येतात ! जो येईल त्याच्याजवळ बसायचें, हंसायचें, त्याला भोगायचें ! सकाळपर्यंत हें असें जीवन. केवढी ही समाजसेवा ! म्हणून सरकार काळजी घेते, लायकीचीं प्रशस्तिपत्रें देतें नि म्हणतें चालवा नीट कारखाना !

रूपाचीं अशा या जीवनांत अशीं सात वर्षें गेलीं. ती आतां २८ वर्षांची होती. परंतु कांहीं तरी भानगड झाली. तिच्यावर खटला भरण्यांत आला होता. तिची तुरुंगांत रवानगी करण्यांत आली होती. तिच्या खटल्याचा आज निकाल होता. म्हणून तिला कोर्टाकडे नेण्यांत येत होतें. खिन्नपणें गंभीरपणें ती जात होती.

●●●



तिकडे रूपाला हत्यारी पोलीस नेत होते. आणि इकडे प्रताप मऊमऊ गाद्यांवर लोळत होता. किती सुंदर तो पलंग ! आणि त्या परांच्या गाद्या; नि वरची दुधाच्या फेंसाप्रमाणें स्वच्छ अशी ती चादर ! लोंकरीच्या शाली ! प्रतापला अजून उठावेसें वाटत नव्हतें. परतु शेवटीं तो उठला. सुगंधी

सिगारेट शिलगवून तो ती ओढीत बसला. दिवसा काय काय कामें आहेत तें तो मनांत आठवूं लागला. त्याला आदल्या दिवशींच्या सायंकाळची आठवण आली. तो एका श्रीमंत घरीं गेला होता. तेथील तरुणीशीं तो लग्न करील असा अनेकांचा तर्क होता. तें सारें आठवतांच तो खोलीमध्यें हिंडूं फिरूं लागला. त्या तरुणीशीं लग्न करण्याचा विचार त्याला रुचला नाहीं. शयनागारांतून तो बाहेर आला. सुंदर ब्रशानें उत्कृष्ट दंतमलम घेऊन तो दांत कुंचलूं लागला. तोंड धुऊन झाल्यावर सुगंधी साबण अंगाला लावून त्यानें स्नान केलें. त्याचें शरीर पीळदार होतें. त्याला त्याचा अभिमान वाटत असावा. त्यानें नवे कपडे घातले. त्याच्या घरांतील प्रत्येक वस्तु उत्कृष्ट होती. उत्तम असेल तेंच तो विकत घेई. साबण, ब्रश, बटणें, कपडे, बूट, सारे सर्वोत्तम होतें. कपडे करून तो टेबलाजवळ गेला. तो टपाल पाहूं लागला. मोलकरणीनें तें तेथें आणून ठेवलें होतें. त्याच्या आईची ती जुनी मोलकरीण. आई नुकतीच देवाघरीं गेली होती. ती मोलकरीणच आतां घरांतील सारें करी. स्वयंपाक करी. घरांतील सारें पाही. लहानपणापासून त्याच घरांत ती कामाला होती. घरांतीलच जणूं ती झाली होती. तो टपाल बघत होता. इतक्यांत ती मोलकरीण तेथें येऊन म्हणाली,

'काल ज्या घरीं तुम्ही गेलां होतात तेथून हें पत्र आलें आहे. त्या मुलीचें किंवा तिच्या आईचें असावें. नोकर येऊन देऊन गेला.'

ती मोलकरीण गेली. त्यानें तें पत्र फोडलें. त्या मुलीच्या आईनें मोठ्या ममतेचा आव आणून तें पत्र लिहिलें होतें :

'प्रिय प्रताप,

अरे, तुला आज ज्यूरींत काम करायला जायचें आहे. तूं विसरशील म्हणून सकाळीं उठतांच ही चिठ्ठी पाठवीत आहें. तूं काल आमच्याकडे यायचें कबूल केलें होतेस. वेडया, तुला या सरकारी कामाची आठवणच नव्हती. कोर्टांत वेळेवर जा. नाहीं तर दंड होईल. ध्यानांत ठेव.'

अशा अर्थाचें तें पत्र होतें. त्या तरुणीची माता प्रतापला आपल्या जाळ्यांत ओढूं पाहात होती. बारीक नाजूक जाळें त्याच्याभोंवतीं ती गुंफीत होती. प्रतापशीं आपल्या मुलीचें लग्न लागावें असें तिला वाटत होतें. त्या

मुलीचें वय जरा अधिक होतें. परंतु नक्की प्रेम असल्याशिवाय लग्नाच्या भानगडींत पडायचें नाहीं असें प्रतापनें ठरविलें होतें. एका बड्या अधिकाऱ्याच्या पत्नीनेंहि त्याला मोह पाडला होता. ती का स्वतःच्या नवऱ्या-जवळ काडीमोड करणार होती? हा का तिच्याशीं लग्न करायला तयार झाला असता? तिच्या नवऱ्याचें त्याला एक पत्र आलें होतें. रस्त्यांची एक नवीन योजना होती. शाळाहि बांधायच्या होत्या. त्या कामाची बैठक होती. प्रतापची जमीन त्या बाजूला होती. म्हणून त्या अधिकाऱ्यानें त्याला बोलावलें होतें. प्रतापशीं आपली पत्नी लाडीगोडी करीत आहे याची त्याला कल्पनाहि नव्हती. तो अधिकारी उदारमतवादी होता. 'प्रतिगामी लोकांचा रस्ते करायला विरोध आहे. ते आपल्या जमिनी द्यायला तयार नाहींत. तुम्ही याच.' असें त्यानें प्रतापला आग्रहानें लिहिलें होतें. परंतु जनतेची थोडी फार सेवा करूं पाहाणाऱ्या या उदार माणसाला घरांतील भानगडी माहीत नव्हत्या. प्रतापला अनेक प्रसंग आठवले. त्या अधिकाऱ्याची बायको प्रेमवेडी होऊन जीव द्यायला निघाली. आपण तिचें सान्त्वन केलें. तिच्या केसांवरून हात फिरवला. त्याला सारें आठवलें. आपल्याला तिच्या नवऱ्यानें पाहिलें असेल का? त्याला कळले असतील का ते प्रेमप्रकार? तो या विचारांत होता. त्यानें तिला पत्रहि लिहिलें होतें. 'तुझा माझा केवळ मैत्रीचा संबंध राहो. इतर विचार मनांत आणूं नकोस. पतीशीं निष्ठेनें राहा. यांतच कल्याण आहे.' त्या पत्राचें तिच्याकडून अजून उत्तर आलें नव्हतें. तिचें उत्तर येईपर्यंत इकडे लाघवी मातेला काय सांगायचें? आपल्या मुलीसाठीं ही पाठीस लागली होती. आणि ही मुलगी दुसऱ्याहि कोणाशीं प्रेमयाचना करीत होती. त्याला तें कळलें होतें. म्हणून तर तिच्या आईनें 'कामावर जा, नाहीं तर इकडे येशील.' असें लिहिलें असावें. नाहीं तर ती स्वतःहि आली असती. प्रतापला क्षणभर मत्सर वाटला. आपणांस सोडून दुसऱ्याकडे त्या तरुणीचें लक्ष जावें याचें त्याला वैषम्य वाटलें. परंतु या फंदांतून आपण मोकळे होऊं याचा त्याला आनंद झाला. नंतर त्यानें इतर पत्रें फोडलीं. त्याच्या जमिनीच्या व्यवस्थापकाकडून एक पत्र आलें होतें. त्यानें लिहिलें होतें :

'घरींच शेती करावी. खंडानें देण्यांत अर्थ नाहीं. घरीं

करण्यांत फायदा आहे. बघा, विचार करा. तुम्ही मागितलेले पांच हजार रुपये मीं पाठविले नाहींत. लौकरच पाठवितों. शेतकरी खंडाचे पैसे वेळेवर देत नाहींत. अधिकाऱ्यांची मदत घेतल्या-शिवाय वसूल करतां येत नाहींत.'

अशा हकीगती त्या पत्रांत होत्या. आपल्याजवळ शेंकडों एकर जमीन आहे याचा त्याला आनंद वाटला. परंतु तो गंभीर झाला. एकानें इतकी जमीन ठेवणें पाप आहे असेंहि त्याला वाटत असे. त्यानें पित्याकडून मिळालेली जमीन कुळांना वांटून दिली होती. आतां आईच्या नांवची जमीन त्याला मिळाली होती. ही जमीनहि देऊन टाकावी का? परंतु मग पोटाला काय? सरकारी नोकरीची तर त्याला इच्छा नव्हती. सुखांत तो वाढला होता. त्याच्या गरजा वाढलेल्या होत्या. खर्चाच्या संवयी जडल्या होत्या. हें सारें कसें भागवायचें? तारुण्यांतील त्याच्या महत्त्वाकांक्षा आतां जरा मरगळल्या होत्या. त्याच्या जीवनांत सध्यां अनिश्चितता होती.

परंतु विचारांत रमायला त्याला आज सवड नव्हती. त्याला कोर्टांत जाणें प्राप्त होतें. तो ज्यूरींपैकीं एक होता. केव्हां जायला हवें तें त्यानें पाहिलें. तो उठून दिवाणखान्यांत आला. तेथें कलांचे उत्कृष्ट नमुने होते. तोहि अधूनमधून चित्रें काढी. त्यानें काढलेलीं कांहीं चित्रें तेथें होतीं. कांहीं चित्रें अपुरीं होतीं. परंतु त्याचा हा कलांचा अभ्यासहि अलीकडे बाजूला पडला होता. त्यानें त्या तरुणीच्या आईला एक चिठ्ठी लिहिली, 'मी आजारी आहें. रात्रीं जेवायला आलों तर येईन.' असें त्यानें लिहिलें. परंतु ती चिठी त्याला नीरस वाटली, भावनाहीन वाटली. त्यानें ती टरकवली. त्यानें पुन्हां दुसरी चिठ्ठी लिहिली. परंतु ती दुसरी त्याला अति परिचयाची वाटली. म्हणून तीहि टरकवण्यांत आली. शेवटीं त्यानें चिठ्ठी लिहिलीच नाहीं. 'आजारी आहें. जमलें तर येण्याची खटपट करीन.' असा निरोप पाठवावा असें त्याला वाटलें; परंतु असा निरोप पाठविणें बरें नाहीं असें वाटून जमलें तर, रात्रीं जावें झालें असें तो मनांत म्हणाला. चिठ्ठीहि गेली नाहीं, निरोपहि नाहीं.

पोषाख करून, उंची बूट घालून, सिगारेट तोंडांत धरून तो बाहेर पडला. दारांतच घोड्याची गाडी उभी होती.

'रावसाहेब गाडी पाहिजेना ? तयार आहे. काल ज्या श्रीमंत घरीं गेलां होतात तिकडेच जायचेंना ? मला वाटलेंच होतें कीं, आजहि तुम्हांला गाडी लागेल. बसा.' तो गाडीवान् म्हणाला.

'मला कोर्टांत जायचें आहे' असें म्हणून तो त्या बगींत बसला. या गाडीवानांनाहि माझे संबंध माहीत आहेत! परंतु आणि खरेंच मी लग्न कां करूं नये? हल्लीं माझ्या जीवनाला कांहीं अर्थच नाहीं. लग्न केलें तर बरें नाहीं का? मी कुटुंबी होईन. जबाबदारी कळेल. सुखी होईन्, नीतिमानहि होईन. मुलांबाळांचा आनंद, खरेंच कां बरें मी लग्न करूं नये? परंतु माझें लग्न म्हणजे माझ्या स्वातंत्र्यांतील विघ्न नाहीं का? माझें स्वातंत्र्य कमी नाहीं का होणार? पत्नी मिळेल ती तरी कशी निघेल कोणी सांगावें? लग्न म्हणजे जुगार आहे, सोडत आहे. परंतु तरुण युवयुवतींना अशी भीति कधीं वाटते का? माझें तारुण्य—तें पहिलें उसळणारें तारुण्य–निघून गेलें आहे. आतां मी जरा पोक्त झालों आहें. म्हणून हे भितुरडे विचार, म्हणून या शंका. काल जिच्याकडे गेलों होतों तिच्याशीं करावें का लग्न? ती माझा स्वभाव थोडा फार जाणते. परंतु तिच्याहून अधिक चांगली मुलगी नाहीं का मिळणार? हिचें आतां सत्तावीस वर्षांचें वय आहे. आणि मी कांहीं तिचा पहिला प्रियकर खात्रीनें नसेन. प्रतापच्या मनांत हा विचार येतांच तो दुःखी झाला. त्याचा अभिमान दुखावला. माझ्याशिवाय दुसऱ्या कोणावर तिनें प्रेम केलें असेल तर काय अर्थ? तो विचार त्याला असह्य झाला. परंतु मी तिला भेटेन असें तिला का स्वप्न पडलें होतें? ती तरी काय करणार? परंतु विचार करतां करतां तो अस्वस्थ झाला. त्या मुलीशीं लग्न करायला जितकीं अनुकूल करणें त्याला दिसत होतीं, तितकींच प्रतिकूलहि दिसत होतीं. परंतु त्या अधिकाऱ्याच्या पत्नीचें प्रकरण निकालांत निघाल्याशिवाय या नव्या भानगडींत पडूं नये असें त्यानें मनांत ठरविलें.



आज तर तो सार्वजनिक कर्तव्य बजावण्यासाठीं जात होता; कोर्ट आलें. तो उतरला. भाडें देऊन रुबाबदारपणें तो आंत गेला. जिकडे तिकडे गडबड होती, गर्दी होती. नोकरांची धांवपळ सुरू होती. हातांत कागद

घेऊन ते हांकारे पुकारे करीत होते. ललकाऱ्या मारीत होते. तेथें वकील, बॅरिस्टर वगैरेंची झुंबड होती. वादी, प्रतिवादी उभयपक्षांच्या बाजू मांडल्या जात होत्या. ज्यांना काम नव्हतें असे बेकार वकील रिस्टवॉचकडे बघत आणि आपणहि महत्त्वाचे आहोंत असें दाखवीत उगीच द्रुतगतीनें इकडून तिकडे; तिकडून इकडे ये जा करीत होते. कोणी प्रेक्षक होते. कोणी बसून होते.

'फौजदारी कोर्ट कोणत्या बाजूला?' प्रतापरावांनीं विचारलें.

'उजव्या बाजूला जा; मग डाव्या बाजूला वळा; तेथील दुसरा दरवाजा.'



तो तेथें गेला. तेथें दोन गृहस्थ उभे होते. एक जो उंचसा होतां तो व्यापारी होता. दुसरा एक चिक्कू सावकार होता. लोंकरीच्या कापडा-विषयीं त्यांचें बोलणें चाललें होतें.

'ज्यूरी येथेंच का आहे?' प्रतापनें विचारलें.

'हो. आमच्यापैकींच तुम्हीहि एक दिसतां. आपलें नांव काय?'

'प्रतापराव.'

ज्यूरींत निरनिराळ्या पेशांचे दहा लोक होते. कोणी बसले होते. कोणी हिंडत होते. कोणी एकमेकांचा परिचय करून घेत होते. आपण सार्वजनिक सेवा करायला आलों आहोंत, जबाबदारीच्या कामासाठीं आलों आहोंत, या विचारानें त्यांना समाधान वाटत होतें.

'सार्वजनिक सेवा म्हणून धंदा सोडून आलों. नुकसान झालें तरी सहन केलें पाहिजे. सरकारी कामासाठीं यायला हवें.' एकजण म्हणाला.

'आणि ज्यूरींत यायचें नाकारलें तर, सरकारी अवकृपाहि व्हायची.' दुसरा म्हणाला.

'ज्याचें उठल्या-बसल्या सरकारदरबारीं काम असतें त्यानें सरकारला नाखूष करून कसें चालणार?' तिसरा म्हणाला.

ज्यूरींतील त्या सभ्यांचीं बोलणीं हवा, बाजारभाव, वाढते गुन्हे, इत्यादि विषयांवर चाललीं होतीं. प्रतापरावांची कोणी कोणी ओळख करून घेत होते. कारण त्यांत त्यांना स्वतःचा गौरव वाटत होता. आपल्यापेक्षां हे कोणी तरी बडे असावेत असें त्यांना वाटलें. कारण प्रतापराव रुबाबदार होता. त्याचा पोषाख किंमती होता. त्याला अनेक भाषा येत होत्या. त्यालाहि वाटत होतें कीं, यांनीं मला मान दिलाच पाहिजे. मान घेण्याचा आपला जणूं हक्क आहे असें त्याला वाटलें. ज्यूरींपैकीं एकजण त्याच्या बहिणीच्या मुलांना शिकवायला जात असे. तो अतिपरिचय दाखवूं लागला. अधिक बडबड करूं लागला. प्रतापरावाला तें आवडलें नाहीं.

'तुम्ही सुद्धां या ज्यूरींत?' असें म्हणून तो हंसला.

'निसटून जातां येईना.' प्रतापरावानें तुटक उत्तर दिलें.

'मीं निसटण्याचा प्रयत्नच केला नाहीं.' मोठेपणाचा आविर्भाव दाखवीत तो शिक्षक म्हणाला.

'चांगलें केलेंत. यालाच सार्वजनिक सेवेची वृत्ति, खरी धर्मपर वृत्ति असें म्हणतात. परंतु ही वृत्ति फार टिकत नाहीं. भूक लागूं दे, झोंप यायला लागूं दे, म्हणजे मग हीं सार्वजनिक कामें म्हणजे ब्याद वाटते. नको ही पीडा असें वाटतें.' प्रतापराव म्हणाला.

ज्यूरींतील एकजण अजून यावयाचा होता. मुख्य न्यायाधीशहि अजून

आले नव्हते. परंतु लौकरच ते आले. खटला पटकन् संपवून त्यांना जायचें होतें.

‘ ते गृहस्थ अजून कसे आले नाहींत ? नेहमींच ते उशीर करतात. सरकारी कामांत उशीर करायला यांना लाजहि वाटत नाहीं.’ न्यायाधीश पुटपुटले. हे न्यायाधीश धिप्पाड होते. विवाहित होते तरी व्यभिचारी होते. त्यांची पत्नीहि त्यांच्याप्रमाणेंच प्रेमलीला करी. खटला संपवून त्या न्यायाधीशांस एका तरुणीला भेटायला जायचें होतें. केव्हां एकदां खटला सुरू होऊन आपण जाऊं असें त्यांना झालें होतें. कपाळाला आंठ्या घालून ते बसले.

इतक्यांत ते उशीर करणारे गृहस्थ आले. सरकारी वकीलहि आले. इतर आरोपींचे वकील होते. परंतु रूपाचा वकील नव्हता.

‘ आज प्रथम कोणता खटला ? ’ न्यायाधीशांनीं विचारलें.

‘ विषप्रयोगाचा. ’ सरकारी वकील म्हणाले.

‘ तयारी आहे तुमची ? ’

‘ हो. ’

सरकारी वकिलाची तयारी नेहमींच असे. तो रात्रीं अनेक पत्तें लिही. थोडेंफार कामकाजाविषयीं पाहून ठेवी. दारू पिई. विषप्रयोगाच्या खटल्यांतील त्यानें कांहींहि पाहून ठेवलें नव्हतें. न्यायाधीशांनीं दुसऱ्या एका खटल्यांविषयीं विचारलें; परंतु साक्षीदार नव्हते म्हणून तो बाजूला ठेवण्यांत आला. आणि विषप्रयोगाच्या खटल्याचें काम सुरू झालें.

‘ ज्यूरींतील सारे हजर आहेत ? ’

‘ होय. ’ तो व्यापारी म्हणाला.

सर्वांचीं नांवें उच्चारण्यांत आलीं. सर्वांनीं हजेरी दिली. सारे गंभीर तोंडें करून बसले. आपण कोणी तरी फार मोठे जबाबदार असें त्यांना वाटत होतें. अपराधी कैद्यांना आणण्यांत आलें. आरोपी तीन होते. त्या तिघांचें आगमन होतांच सर्वांनीं त्यांच्याकडे पाहिलें. दोन स्त्रिया होत्या. एक पुरुष होता. रूपाकडे बघतांच सारे चलबिचल झाले. त्यांची दृष्टि तिच्यावर खिळली. तिचे डोळे तेजस्वी, काळेभोर होते. ते हत्यारी पोलीसहि तिच्याकडे पाहूं लागले. परंतु अपराध्यासारखें वाटून ते बिचारे दुसरीकडे

पाहूं लागले. परंतु न्यायाधीश व ज्यूरींतील सभासद, यांना तिच्याकडे टक लावून बघायला लाज वाटली नाहीं. कारण ते सार्वजनिक सेवा करणारे जबाबदार लोक होते!

ज्यूरींना कर्तव्यासंबंधीं प्रवचन देण्यांत आलें.

'तुम्ही न्याय करणारे. निःपक्षपाती दृष्टीनें पुराव्याकडे पाहा. तुमची जबाबदारी मोठी आहे. तुम्ही सुज्ञ आहांत. ठीक.'

'आरोपी नंबर एक रामधन': पुकारा झाला.

'रामधन उभा राहा.' न्यायाधीश म्हणाले. तो उभा राहिला.

'तूं रामधन?'

'होय.'

'तुझा धंदा?'

'शेतीचा. परंतु शेती परवडत नाहीं म्हणून शहरांत आलों. हॉटेलांत नोकरी हा सध्यांचा धंदा.'

'तुझें वय?'

'वय तेहतीस.'

'विवाहित कीं अविवाहित?'

'अविवाहित.'

'पूर्वीं कधीं खटला तुझ्यावर झाला होता?'

'नाहीं.'

'तुझ्यावर जो आरोप करण्यांत आला आहे तो तुला मान्य आहे? गुन्हा कबूल आहे?'

'देवाशपथ मला कांहींहि माहीत नाहीं. आरोपपत्र मिळालें आहे. परंतु मी निरापराधी आहें.'

'बस खालीं.'

तो खालीं बसेना. त्याला पुन्हां पुन्हां सांगण्यांत आलें. शेवटीं शिपायानें त्याला ओढलें तेव्हां तो बसला.

दुसरा आरोपी उभा राहिला. ती बाई होती. तिचें नांव रमी. तिचें चेचाळीस वर्षांचें वय होतें. रामधन ज्या हॉटेलांत नोकरीला होता, तेथेंच

तीहि कामाला होती. तिच्यावरहि यापूर्वी कधीं खटला झालेला नव्हता. आरोपपत्र तिला मिळालें होतें. तिनेंहि ' गुन्हा नाकबूल ' असें सांगितलें.

आतां तिसऱ्या आरोपीची विचारणा सुरू झाली.

तिसरा आरोपी म्हणजे ती रूपा.

' तुझें नांव ? ' सरकारी वकिलानें मृदु वाणीनें विचारलें.

' रूपा. '

' उभें राहून सांगायला हवें. उभी राहा.'

ती हंसली नि उभी राहिली.

प्रतापनें रूपाला ओळखलें. तो चकित झाला. जिला आपण मोहांत पाडिलें, जिला भोगलें नि दूर फेंकलें तीच ही मुलगी. त्याला सत्याचा अभिमान होता; परंतु या मुलीची त्यानें वंचना केली होती. तो तिला विसरून गेला होता. रूपाच्या चेहऱ्यावर विशिष्ट व्यक्तिमत्त्वाचा ठसा होता. कोठेंहि ती उमटून सिदली असती, निराळी दिसली असती. तिचा चेहरा जरा फिक्कट होता. तरीहि त्याच्यावर एकप्रकारची मधुरता होती. तिच्या ओठांवर मंद स्मित होतें. तिच्या डोळ्यांत एक अपूर्व चमक होती. तिच्या आवाजांत अकपटता होती.

' तुझें घराणें कोणतें ? वडिलांचें नांव ? ' प्रश्न करण्यांत आला.

' मी बेवारशी आहें. ' ती म्हणाली.

थोडा वेळ सारे स्तब्ध होते.

' तुझी जात ? '

' मी मजूर आहें. '

' तुझा धंदा ? '

' मी त्या विशिष्ट संस्थेंत असतें. '

' कोणती संस्था ? '

' ती तुमच्यापैकीं पुष्कळांना माहीत आहे. ' ती सस्मितपणें म्हणाली.

तिच्या त्या उत्तरानें क्षणभर तेथें गंभीर शान्ति पसरली. तिच्या त्या उत्तरांत एकप्रकारची करुणा होती नि कठोरताहि होती. त्यांत भीषणताहि होती.

‘ तुझ्यावर पूर्वी कधीं खटला झाला होता ? ’

‘ नाहीं. ’

‘ आरोपपत्र मिळालें ? ’

‘ हो. ’

‘ बसा खालीं. ’

साक्षीदारांच्या साक्षी झाल्या. नंतर डॉक्टरांची शास्त्रीय परिभाषेंत साक्ष झाली. आरोप वाचून दाखविण्यांत आले. आरोप ऐकतांना ज्यूरींपैकीं कोणी जांभया दिल्या. तिकडे रामधन सुपारीचें खांड चघळीत होता. रमी सरळ मान ठेवून बसली होती. परंतु रूपा एकदम चमकते, दुःखी होते. कांहीं उत्तर देण्यासाठीं ती उत्सुक दिसते. ती घाबरते, बावरते. ती मध्येंच खालीं बघे, लाजेनें मरे. हात कुस्करीत बसे. तिनें प्रतापरावावर दृष्टि खिळविली. तिनें का त्याला ओळखलें ? नाहीं. त्याची स्मृति तिनें आपल्या जीवनांत खोल खालीं दडपून टाकली होती. प्रतापच्या हृदयांत तुमुल युद्ध सुरू झालें.

या खटल्याची हकीगत पुढीलप्रमाणें होती :

मुंबईच्या एका हॉटेलांत खुशालशेठ नांवाचे व्यापारी आपल्या खोलींत मृतवत् स्थितींत आढळले. पंचनामा झाला. त्यांच्या शरीराची चिरफाड केल्यावर सरकारी डॉक्टरांना विषप्रयोग झाल्याचें कळून आलें. कोणी केला विषप्रयोग ? चौकशी सुरू झाली. त्या व्यापाऱ्यानें बँकेंतून नुकतेच तीन हजार रुपये काढले होते. हॉटेलच्या मालकासहि ती गोष्ट माहीत होती. परंतु मरणानंतर पंचनामा केलेल्या त्या व्यापाऱ्याच्या बॅगेंत फक्त तीनशें रुपये नि कांहीं आणे आढळले. बाकीच्या पैशाचें काय झालें ?

मरायच्या आदल्या दिवशीं तो रूपाच्या संगतींत होता. दिवसा रात्रीं तिच्याच संगतींत तो रमला. रूपा दोनदां हॉटेलांतील त्याच्या खोलींत आली होती. व्यापाऱ्यानें रूपाला हिऱ्याची आंगठी दिली होती. तिनें ती वेश्यागाराच्या मालकिणीला विकली—दिली. रमीनें तो व्यापारी मेल्यावर दुसऱ्याच दिवशीं बँकेंत दोन हजार रुपये ठेवले. रूपानें सांगितलें कीं, व्यापाऱ्याला झोंप यावी म्हणून आपण त्याला दारूतून झोंपेची पूड दिली. ही

पूड रामधननें तिला दिली. रमीहि त्या वेळेस हजर होती. मीं ' पूड दिली ' असें रूपानें आपण होऊन कबूल केलें.

फेरतपासणींत रूपा म्हणाली व्यापारी वेश्यागारांत आला होता. त्यानें मला हॉटेलांत जाऊन बॅगेतून पैसे आणायला सांगितलें. त्यानें किल्ली दिली. मीं जाऊन कुलूप काढलें. मी सांगितल्याप्रमाणें फक्त चाळीस रुपये घेतले. रामधन आणि रमी यांच्या देखतच मीं बॅग उघडली. व्यापारी हॉटेलांत परत गेला. परंतु रात्रीं त्याचा पुन्हां माझ्यासाठीं निरोप आला. वेश्यागाराच्या मालकिणीनें मला हॉटेलांत जायला भाग पाडलें. मी थकून गेलें होतें. मीं हॉटेलांत गेलें. मी अनिच्छा दर्शविली. त्यानें मला तडाखा दिला. परंतु मी ओरडेन, निघून जाईन असें वाटून तो पुन्हां गोड बोलूं लागला. त्यानें मला ती आंगठी दिली. मी क्षणभर बाहेर आलें. रामधन आणि रमी तेथें होतीं. मीं त्यांना म्हटलें, ' काय करावें? हा व्यापारी झोंपला तर किती छान होईल? मी सुटेन.''

' त्याला झोंपेची पूड दे.' तीं दोघें म्हणालीं.

' नुसती झोंपेची ना?' मीं विचारलें.

' हो. सकाळीं तो पुन्हां उठेल. निरुपद्रवी पूड. आणि मीं पूड दिली. केवळ तो झोंपावा म्हणून.' ती म्हणाली.

रमी म्हणाली, ' मी दिवसभर कामांत होतें. मी त्या व्यापाऱ्याच्या खोलींतहि गेलें नाहीं. दिवसभर हीच त्याच्या खोलींत होती. रात्रीहि ही आली होती. पैसे हिनेंच चोरले असले पाहिजेत.'

' मग तूं दोन हजार रुपये ठेवलेस बँकेंत ते कुठले?'

' ते माझ्या स्वतःच्या श्रमाचे. अठरा वर्षांची ती माझी कष्टाची कमाई आहे. मी रामधनशीं लौकरच लग्न करणार आहें. आमच्या संसारासाठीं ती पुंजी आहे.'

रामधन म्हणाला, ' मला कांहीं माहीत नाहीं. मीं पूड दिली नाहीं. मी निरपराधी आहें.'

त्यानें आरंभीं पूड दिल्याचें कबूल केलें होतें. परंतु आतां त्यानें सारेंच नाकारलें.

त्या तिघांवर चोरीचा आरोप ठेवण्यांत आला होता. तिघांनीं बॅगेंतील पैसे आपसांत वांटून घेतले असले पाहिजेत. तिघांवर विषप्रयोगाचाहि आरोप ठेवण्यांत आला होता. अशा या खटल्याचा.आज निकाल होता.

ज्यूरीसमोर आज काम चालायचें होतें.

‘ रामधन, आरोप कबूल आहे ? ’ प्रश्न करण्यांत आला.

‘ नाहीं. हॉटेलांत जे पाहुणे येतात, त्यांची बरदास्त ठेवणें एवढेंच माझें काम. ’

‘ गुन्हा कबूल आहे कीं नाहीं ? होय कीं नाहीं तेवढें सांग. तुझें इतर पुराण नको. ’

‘ नाहीं. मी फक्त... ’

‘ होय कीं नाहीं ? ’

‘ गुन्हा कसा कबूल करूं ? ’

‘ तूं ग ? रमी, तुला कबूल आहे ? ’

‘ मीं कांहीं एक केलें नाहीं. खोलींत गेलें नाहीं. याच डाकिणीनें सारें केलें आहे. ’

‘ तें सारें मागून. होय कीं नाहीं उत्तर द्या. ’

‘ मी खोलींत गेलें नाहीं, पैसे घेतले नाहींत, विष दिलें नाहीं. ’

‘ गुन्हा नाहीं ना केलास ? ’

‘ नाहीं. ’

‘ रूपा, तूं ? ’

‘ मी निरपराधी आहें. मी फक्त त्यानें सांगितलेले चाळीस रुपये नेले. आंगठी त्यानेंच दिली. चोरीच्या पैशांतून मी आंगठी घेतली नाहीं. ’

‘ तूं पैसे नाहीं चोरलेस ? ’

‘ नाहीं. ’

‘ परंतु पेल्यांत पूड टाकून दिलीस ना ? ’

‘ हो. परंतु त्याला झोंप लागावी म्हणून. त्या पुडीनें कांहीं अपाय होईल अशी मला कल्पनाहि नव्हती. माझ्या मनांत तसा विचारहि नव्हता तशी इच्छाहि नव्हती. देव साक्षी आहे. माझ्या मनांत खरोखर कांहीं वाईट नव्हतें. ’

‘ तूं पैसे चोरले नाहींस, परंतु पूड दिल्याचें कबूल करतेस. होय ना?’

‘ हो. परंतु ती झोंपेची समजून मीं दिली. त्याला झोंप लागावी. एवढ्याच हेतूनें.’

‘ हें बघ, तूं सारें खरें खरें सांग बघू. खरें सांगशील तर तें तुझ्याच हिताचें आहे. सांग—’

‘ काय सांगूं? मी हॉटेलांत गेलें. त्याची खोली मला दाखवण्यांत आली. त्या खोलींत तो होता. दारू पिऊन तर्रर होता. मी ‘ नको ’ सांगून परत जाऊं इच्छित होतें. परंतु तो जाऊं देईना. ’

‘ पुढें ? ’

‘ पुढें काय? थोडा वेळ तेथें राहिलें नि मी परत गेलें. ’

‘ या व्यापाऱ्याचा नि या रामधनचा आधींपासून परिचय होता का?’

‘ हो. ’

‘ त्या रामधनचा नि तुझा काय संबंध ? ’

‘ तो पाहुण्यांसाठीं मला बोलावतो. त्याचा माझा दुसरा कांहीं संबंध नाहीं. ’

‘ तुलाच तो कां बोलावतो ? ’

‘ तें मी काय सांगूं? त्याच्या मनांत येईल तिला तो बोलावतो.’

असें बोलून रूपानें प्रतापकडे पाहिलें. तिनें त्याला का ओळखलें? प्रभूला माहीत.

‘ तुझा एकंदरींत रामधनशीं फारसा परिचय नाहीं. ठीक. पुढें ? ’

‘ पुढें काय? मी घरीं गेलें. धनिणीजवळ पैसे दिले. मी झोंपलें. परंतु डोळा लागतो न लागतो तों मला परत उठवण्यांत आलें. तो मला न्यायला आला होता. मला जायची इच्छा नव्हती. परंतु धनिणीनें हुकूम दिला. चाळीस रुपये तो ठरवीत होता. तो पैसे घेऊन आला नव्हता. त्यानें मला पैसे घेऊन येण्यासाठीं किल्ली दिली. ’

‘ तूं गेलीस हॉटेलांत. पुढें ? ’

‘ मी त्या खोलींत गेलें. परंतु एकटी नाहीं गेलें. रामधन नि रमी यांनाहि बोलावलें. ’

‘ साफ खोटें.’ तीं दोघें खवळून म्हणालीं.

‘ दोघें माझ्याबरोबर होतीं. मीं त्यांच्यादेखत दहादहाच्या चार नोटा काढून घेतल्या. ’

‘ पाकिटांत किती पैसे होते ? ’

‘ मीं मोजले नाहींत. परंतु शंभराच्याहि कांहीं नोटा होत्या. ’

‘ बघा. आरोपी शंभराच्या नोटा पाहिल्याचें सांगत आहे.’ रामधन निरमीचा वकील म्हणाला.

‘ बरें, तूं पैसे नेलेस. पुढें ? ’

‘ मी पैसे घेऊन आलें नि ते मालकिणीजवळ दिले. आणि त्यानें जातांना मला आपल्याबरोबर नेलें. ’

‘ आणि पेल्यांतून तूं पूड दिलीस ? ’

‘ हो. ’

‘ कां दिलीस ? ’

ती लाजली; परंतु म्हणाली, ‘ तो मला जाऊं देईना. मी गळून गेलें होतें. मीं गॅलरींत रामधनला म्हटलें, ‘ माझ्या डोळ्यांवर झोंप आहे. थकलें आहें मी. हा जाऊं देत नाहीं. करूं तरी काय ? ’ तेव्हां तो म्हणाला, ‘ आम्हांलाहि याचा कंटाळा आला आहे. सारखी याचीं कामें. फार सतावतो. त्याला झोंपेचा घोट द्यावा, असें आम्हांसहि वाटत होतें. तूं देतेस ? दे. तो झोंपेल. तो झोंपला म्हणजे तूं जा. ’

‘ अस्सें. ठीक. पुढें ? ’

‘ मला वाटलें ती पूड निरुपद्रवी असेल. मी खोलींत गेलें. त्यानें ब्रँडी मागितली. मीं बाटली ओतून तिच्यांत ती पूड टाकून त्याला दिली. ती पूड म्हणजे विष आहे असें मला माहीत असतें तर, मीं ती दिली नसती. ’

‘ आणि आंगठी कशी आली ? ’

‘ त्यानेंच ती दिली. ’

‘ केव्हां ? ’

‘ त्याच्या खोलींत जेव्हां त्याच्याबरोबर अनिच्छेनें मी पुन्हां आलें, मीं अनिच्छा दर्शविली, तेव्हां त्यानें माझ्या डोक्यावर तडाखा दिला. मी संतापलें. तो वरमला. त्यानें ती आंगठी दिली. ’

‘ त्याच्या खोलींत किती वेळ होतीस ? ’

‘ मला आठवत नाहीं. ’

‘ व्यापाऱ्याला सोडल्यावर दुसरीकडे कोठें गेलीस का ? ’

‘ मी जवळच्या रिकाम्या खोलींत गेलें. ’

‘ कां ? ’

‘ जरा विसांवा घ्यायला. गाडी येईपर्यंत तेथें बसलें. ’

‘ रामधन कोठें होता ? ’

‘ तोहि आला. त्यानें उरलेली दारू घेतली. ’

‘ तूं त्याच्याजवळ कांहीं बोललीस ? ’

‘ कांहीं नाहीं. कशाविषयीं मी बोलणार ? मला खरोखर जेवढें माहीत आहे तें मीं सांगितलें आहे. मी निरपराधी आहें. प्रभूला सारे माहीत. आतां वाटेल तें करा. ’

‘ आणखी कांहीं सांगायचें आहे ? ’

‘ कांहीं नाहीं. मीं सारें सांगितलें. ’

आतां कोणाला कांहीं सांगायचें नव्हतें. ज्यूरी उठली. आपसांत विचारविनिमय करण्यासाठीं सारे गेले.

• • •

हीच ती रूपा. होय. हीच ती. तिचा नि प्रतापचा काय होता संबंध ? काय आहे ती कथा.

त्या दोघांची प्रथम भेट झाली तेव्हां प्रताप कॉलेजमध्यें शिकत होता. तिसऱ्या वर्षांत होता. तो आपल्या त्या दोन मावश्यांकडे गेला होता. त्याला सुट्टी होती. जमीनदारी नष्ट करावी या विषयावर त्याला निबंध लिहायचा होता. म्हणून तो मावश्यांकडे निवान्त वेळ मिळेल म्हणून गेला होता. त्याच्या बहिणीचें नुकतेंच लग्न झालें होतें. आई विश्रांतीसाठीं महाबळेश्वरीं गेली होती. आणि तो इकडे आला होता. मावश्यांचें भाच्यावर फार प्रेम होतें. त्याच्यावर कोणीहि प्रेम केलें असतें. आणि त्या दोन्ही मावश्यांच्या मिळकतीचा, मालमत्तेचा तोच पुढें वारस व्हायचा होता. तो त्या वेळेस अगदीं तरुण होता. नुकतीच त्याची विशी संपली होती. पंचविशी अजून दूर होती. तारुण्य म्हणजे धन्यतम जीवन ! त्या वेळेस आपण महान् ध्येयें डोळ्यांसमोर ठेवीत असतों. आकांक्षा उच्च असतात. पूर्ण-

तेला गांठावें असें वाटत असतें. जीवन कृतार्थ करावें असे मनांत विचार उसळत असतात. त्याला आईच्या माहेरची हजार एकर जमीन मिळाली होती. वडिलांची जमीन त्यानें कुळांना देऊन टाकली होती. जमीनदारी पद्धतींतील भेसूर क्रूरता, हिडीस अन्याय यांचें त्याला दर्शन झालें होतें. त्याच्या सदसद्विवेकबुद्धीस तें सहन होईना. दुनिया सुखी व्हावी, श्रमणारे सुखी व्हावेत म्हणून त्यानें त्याग करायचें ठरविलें होतें. त्याप्रमाणें वडिलांची जमीन त्यानें कुळांना वांटून दिलीहि. मावश्यांकडे तो जेव्हां आला तेव्हां अशा ध्येयवादी विचारांचा तो होता.

तो उत्साहानें उसळत होता. तो लौकर उठे. पहांटेसच नदीवर आंघोळीस जाई. धुकें पडलेलें असे. एकप्रकारचें गूढ सौंदर्य त्याला सर्वत्र प्रतीत होई. फुलें, तृणें यांवर दंव पडलेलें असे. जणूं झिरझिरीत ओढणी सृष्टीनें घेतली आहे असें दिसे. तें रजतहरित सुंदर वातावरण बघत बघत तो घरीं येई. नंतर तो लेखनांत रमे. नाना संदर्भ ग्रंथ चाळी. कधीं कधीं तो शेतांतून हिंडे, मळ्यांतून फिरे. शेतांचा तो स्वच्छ, सुंदर, निरोगी सुगंध त्याला आवडे. कधीं जंगलांत तो एकटाच फिरत जाई. तो पांखरें बघे, वृक्षवेली पाही. एखाद्या विशाल वृक्षाच्या बुंध्याशीं तो बसे नि सृष्टीशीं एकरूप होई. तिसरे प्रहरीं तो जरा वामकुक्षी करी. मग बागेंत फिरे. एखादे वेळेस सकाळीं घोड्यावर बसून तो रपेट करी. कधीं तो नदीतीरीं जाई, नौकाविहार करी. कधीं रात्रीं पिठासारख्या चांदण्यांत तो बाहेर फिरायला जाई. त्याला झोंप येत नसे. थकवा ही वस्तूच त्याला माहीत नव्हती. जीवनांतील निष्पाप आनंदांत तो मस्त होता. त्याचें हृदय आनंदानें, उदारतेनें ओथंबलेलें असे. असा त्याचा सुट्टीचा पहिला महिना गेला. सुख, शान्ति, आनंद, उल्हास, उत्साह यांनीं भरलेलें त्याचें विश्व होतें. आईच्या प्रेमळ पाखरेखालीं तो वाढलेला होता. तो विशुद्ध होता, स्फटिकवत् निर्मळ होता. कधीं त्याच्या मनांत स्त्रीविषयक विचार आलाच तर तो पत्नी म्हणूनच येई. ज्यांच्याजवळ तो लग्न करूं शकत नव्हता त्या त्याला माता होत्या.

आणि एका सणाच्या दिवशीं मावश्यांकडे दोन पाहुणे आले. एक मुलगा नि एक मुलगी. तींहि दोघें तरुण होतीं. एके दिवशीं चहा पिऊन

प्रताप, तीं दोन्ही मुलें, आणि रूपाहि बागेंत खेळायला गेलीं. प्रताप, नि रूपा एका बाजूला आणि पाहुणी तरुण मंडळी दुसऱ्या बाजूला. प्रतापला रूपाचें मुखमंडळ आवडे. परंतु अधिक विचार त्याच्या मनांत आला नव्हता. ती तरुण पाहुणे मंडळी प्रताप नि रूपा यांना पकडण्यासाठीं धांवली. खेळ असा होता कीं, ज्यांच्यावर राज्य त्यांनीं विरुद्ध बाजूच्या दोघांना एकमेकांच्या हातांत हात घालूं द्यायचा नाहीं. एक, दोन, तीन—झाला खेळ सुरू. प्रताप रूपाच्या हातांत हात देण्यासाठीं तिच्या पाठीमागें धांवत होता. त्याला तसें करूं न देण्यासाठीं दुसरीं दोघें धांवपळ करीत होतीं. आणि वाटेंत एक कांटेरी झुडूप आलें. पलीकडे रूपा होती. प्रताप थबकला.

'अरे तिकडून वळून ये. आपण भेटूं. ये पटकन्.' ती ओरडली.

तो बाजूनें वेगानें येऊं लागला. परंतु तेथें एक खळगा होता. त्या खळग्यांत गवत वाढलेलें होतें. खळगा आहे असें त्याला वाटलें नाहीं. आणि गवतावर दंव पडलें होतें. प्रतापचा पाय घसरला. तो पडला. परंतु लगेच उठला, हंसला, जणूं कांहीं झालेंच नाहीं. रूपा हरणाप्रमाणें त्याच्याकडे धांवत आली. तिचें तोंड आनंदानें फुललें होतें. तिचे ते काळेभोर डोळे मधुर तेजानें चमकत होते. तिचा मुखचंद्र घामानें डंवरला होता. किती सुंदर दिसत होती ती ! तिनें त्याचा हात हातांत घेतला. तिनें तो कुरवाळला; त्या हाताचें तिनें चुंबन घेतलें.

'कांटे बोंचले. होय ना ? नक्कीच बोंचले. कोठें बोंचले ?' आपल्या केंसांची सारखी पुढें येणारी बट मागें सारीत तिनें प्रेमस्नेहानें विचारलें.

'मला काय माहीत कीं तेथें खळगा आहे.' तो म्हणाला आणि तीं दोघें एकमेकांच्या जवळ बसलीं, हंसलीं, आनंदलीं. त्यानेंहि तिच्या हाताचें चुंबन घेतलें.

'चल, आपण जाऊं' असें म्हणून त्याच्या हातांतून हात मोकळा करून ती पळून गेली. झाडाची एक डहाळी तोडून घेऊन ती वारा घेत दूर उभी राहिली. तिनें त्याच्याकडे प्रेमानें पाहिलें आणि नंतर पटकन् त्या दुसऱ्या खेळाडूंना ती जाऊन मिळाली. त्या दिवसापासून त्या दोघांत, दोन तरुण जीवांत असणारा पवित्र, प्रेमळ, कोमल संबंध निर्माण झाला. ती किंवा तिचा पदर दुरून दिसतांच त्याची सारी सृष्टि उजळे, त्याचें सारें विश्व

सुंदर होई. सूर्य येतांच ज्याप्रमाणें सारें प्रकाशमय, सुंदर दिसतें तसें त्याचें होई. त्याला सारें जीवन आनंदमय, प्रकाशमय वाटे. आणि तिलाहि तसेंच वाटे. त्याच्या अस्तित्वाचा, जवळपास असण्याचा विचारहि तिच्या मनाला फुलवी, प्रमुदित करी. दोघें एका निराळ्याच, भावनामय, कोमल अशा जगांत विहरूं लागलीं. प्रतापला कधीं तारुण्यसहज खिन्नता वा उदासीनता आलीच तर रूपाचा विचार तें सारें दूर करी. पुन्हां त्याचा चेहरा फुले, हृदय उत्साहानें भरे.

रूपाला घरांत काम असे. तरीहि ती वेळ काढी. प्रताप तिला पुस्तकें वाचायला देई, गोष्टीचीं पुस्तकें देई. कादंबऱ्या देई. कधीं अंगणांत वा बागेत तीं भेटत, बोलत. दोघें जेव्हां एकत्र येत तेव्हां त्यांचे डोळे आतां निराळेंच बोलत. त्यामुळें तोंडानें बोलणें फार होत नसे. एकमेकांकडे उत्कटतेनें बघावें, हातानें हात दाबावा असें होई. ओठ मुकेच असत. एखादे वेळेस त्यांचें हें प्रेम पाहून त्याच्या मावश्या घाबरत. परंतु त्यांचें प्रेम निर्मळ, निष्पाप होतें. म्हणून सांभाळ होता. रूपाच्या शरीरावर सत्ता मिळावी. असा विचार कधीं मनांत आलाच तर, प्रताप कावराबावरा होई. तो घाबरे. त्याच्या मावश्यांना वाटलें कीं, आपला भाचा ध्येयवादी असल्यामुळें जर त्याचें प्रेम रूपावर बसलें तर, तो तिच्याशीं विवाह करायला मागें पुढें पाहाणार नाहीं. एका मोलकरणीची बेवारशी मुलगी, तिच्याशीं कसें लग्न करायचें, असा विचार त्याच्या मनांतहि येणार नाहीं. जर या भिकारणीशीं त्यानें लग्न केलें तर, ती केवढी अप्रतिष्ठा! आपली नाचक्की होईल. आपलें केवढें घराणें! तिकडे प्रतापची बहीण काय म्हणेल? त्याची आई काय म्हणेल? अशा मुलीशीं लग्न करणें बरें नाहीं, शोभत नाही असें कोणी प्रतापला म्हणता तर, तो म्हणाला असता, 'काय हरकत आहे? मी एक मानवता ओळखतों. कृत्रिम उच्चनीच भेद मी मानीत नाहीं. श्रीमंत ते सारे थोर आणि दरिद्री ते हीन असें म्हणणें वेडेपणा आहे. श्रीमंत माणसें नीच असतात तर गरीब माणसें थोर असतात.' प्रतापच्या दोन्ही मावश्यांना चिंता होती. परंतु तिकडून आईचें निघून येण्याविषयीं बोलावणें आलें. आणि प्रताप परत जायला निघाला. त्याला जातांना खिन्नता वाटली नाहीं. त्याचें प्रेम निर्मळ होतें. तें निरपेक्ष होतें. तो आनंदानें उसळत होता. स्टेशनवर गाडी न्यायला आली. मावश्या

पोंचवायला जात होत्या. आणि रूपा तेथेंच उभी होती. तिचे टपोरे डोळे भरून आले होते. तेव्हां तोहि सद्ग‌दित झाला. त्याला प्रेमाच्या खोलीची जाणीव झाली. आपण कांहीं तरी मोलाचें येथें सोडून जात आहोंत असें त्याला वाटलें. कांहीं तरी सुंदर, मधुर असें सोडून जात आहोंत असें त्याला वाटलें. त्याला आतां वाईट वाटलें.



'जातों हं रूपा' तो म्हणाला.

'ये हो.' ती म्हणाली. आपले अश्रू रोधून तेथें तीउभी होती. आणि तो गेला. गाडींत बसून स्टेशनवर गेला. मावश्या बरोबर गेल्या. रूपा धांवत पळत घरांत गेली आणि ती मुक्त कंठानें पोटभर रडली.

आणि पुन्हां तीन-चार वर्षांनंतर तो आपल्या मावश्यांकडे आला. त्याचें शिक्षण संपलें होतें. ध्येयवाद संपला होता. तो लष्करांत मोठ्या हुद्द्यावर लौकरच जाणार होता. तो आतां पूर्वींचा प्रताप नव्हता. प्रामाणिक, निःस्वार्थी, निर्मळ नि उदार प्रताप मरून त्याच्या जागीं स्वार्थी, भोगी

प्रताप जन्माला आला होता. तो आतां एक अहंकारी नि भ्रष्ट तरुण झाला होता. त्याचा त्याग मावळला होता. केवळ सुखोपभोगासाठीं जगणारा तो झाला होता. पूर्वीं तो आला होता तेव्हां त्याची दृष्टि या विश्वाकडे आश्चर्यानें बघे. जगाचें, विश्वाचें कोडें सोडवावें, सृष्टींत सर्वत्र लपून राहिलेल्या प्रभूला हुडकून काढावें अशी त्याची दृष्टि होती. आतां तें कांहीं एक उरलें नव्हतें. त्याच्या समोर आतां सृष्टीचें कोडें नव्हतें. गहन गंभीर गूढ असें कांहीं एक नव्हतें. आतां सारें सोपें, सुटसुटित झालें होतें. खावें, प्यावें, मजा करावी, यांत त्याचें सारें जग होतें. यांत त्याचें सारें तत्त्वज्ञान होतें. सदसद्विवेकबुद्धि मरून पडली होती. पूर्वीं त्याला या सृष्टीशीं एकरूप व्हावें असें वाटे. निसर्गाच्या संगीतसिंधूंत तो डुंबे. सृष्टीच्या महाकाव्यांत रमे. कधीं तो कवि होत असे, तर कधीं खोल दृष्टीनें पाहाणारा तत्त्वज्ञानी होऊं पाहात असे. त्या वेळेस स्त्रिया म्हणजे गूढ वस्तू, सौंदर्यानें भरलेल्या असें त्याला वाटे. त्यांच्याकडे तो आदरानें, कौतुकानें पाही. आतां केवळ भोगैकदृष्टीनें तो त्यांच्याकडे बघे. स्त्री म्हणजे उपभोगाची चीज. याहून आतां त्याला कांहीं अधिक वाटत नसे. पूर्वीं त्याला पैशाची फारशी जरूर लागत नसे. आतां कितीहि पैसे असले तरी त्याला पुरेसे होत नसत. आईजवळ एकदां पैशासाठीं तो भांडलाहि. पूर्वीं तो आला होता, तेव्हां तो आत्म्याची, उदार भावनांची, सत्यं, शिवं, सुंदरं यांची पूजा करणारा होता. आतां सुखासक्त होऊन केवळ देहाची पूजा करणारा होऊन तो आला होता. अहंच्या पलीकडे त्याला आतां कांहीं दिसत नव्हतें. पूर्वीं तो स्वतःवर विश्वास ठेवी; स्वतःचीं मतें, विचार, सदसद्विवेकबुद्धि यांना तो मानी. एखादी गोष्ट, एखादा विचार आपल्याला पसंत आहे कीं नाहीं हें तो पाही. परंतु आतां तो केवळ अनुकरण करणारा झाला होता. दुसऱ्याप्रमाणें स्वतःहि वागूं लागला होता. आतां त्याला कधींहि निर्णय घ्यावा लागत नसे; मनांत विचार करावा लागत नसे. कसें जगावें हें लोकांनीं ठरवलेंच आहे. सुख भोगावें, दारू प्यावी, व्यभिचार करावा, फसवावें, दंभ दाखवावा इत्यादि गोष्टी म्हणजे जणूं जगाची रीत. पूर्वीं तो स्वतःच्या विचाराप्रमाणें वागे, स्वतःशीं सत्यनिष्ठ राही, आणि म्हणून लोक त्याला हंसत, त्याला बावळट अव्यवहारी म्हणत. या जगांत जगायला तूं नालायक असें त्याला म्हणत,

परंतु आतां तो भोगी झाल्याबरोबर, खुशालचेंडू चंदूलाल झाल्याबरोबर, लोक त्याची वाहवा करूं लागले. ज्या वेळेस ईश्वर, सत्य, ध्येय, न्याय इत्यादि गोष्टींत तो रमणारा होता, त्या वेळेस त्याला वेडपट म्हणून संबोधण्यांत येई. भोळा सांब असें त्याला तिरस्कारानें म्हणत. परंतु आतां तो पाणचट कादंबऱ्या वाचूं लागला, अश्लील बोलूं लागला, वागूं लागला, आणि लोक त्याला उत्तेजन देऊं लागले. आतां हा जरा माणसाळला, माणसांत आला असें त्याला ते म्हणूं लागले. पूर्वी त्याच्या गरजा किती कमी होत्या. दारिद्र्यांत तो आनंद मानी. दारूस शिवतहि नसे. 'मोठे आले साधु जणूं' असें त्याला लोक उपहासानें म्हणत. आतां तो शिकार करूं लागला. निरपराधी पशुपक्षी मारूं लागला. तोंडाचें धुराडें करूं लागला. आणि सारे लोक त्याची नांवाजणी करूं लागले. त्याचे आप्तेष्ट-मित्र 'आतां हा सुधारला' असें कौतुकानें म्हणूं लागले. लग्न होईपर्यंत मी निर्मळ राहीन, स्त्रियांशीं अनैतिक संबंध ठेवणार नाहीं असें तो पूर्वी म्हणे त्या वेळेस त्याला लोक हंसत. आतां तो व्याभिचार म्हणजे नैसर्गिक गोष्ट मानी आणि आईहि त्याच्या या वृत्तीचें कौतुक करूं लागली. माझा बाळ 'बोवा' वगैरे होईल कीं काय अशी भीति वाटे; परंतु आतां त्याची गाडी रुळावर नीट आली आहे. हंसतो, खातो, पितो.' असें आई समाधानपूर्वक बोले ! पूर्वी त्यानें वडिलांची सारी जमीन देऊन टाकली तेव्हां, 'तूं अक्कलशून्य आहेस, अशानें का शेतकरी सुधारणार आहेत ? आळशी होतील, दारू पिऊं लागतील, त्यांच्याजवळ का दिडकी शिल्लक राहाणार आहे ?' असें त्याला सारे म्हणाले; परंतु आतां प्रताप जुगारी बनला, शर्यतीचे घोडे उडवूं लागला, तर त्याची पाठ थोपटण्यांत येऊं लागली. 'आतां तूं खरा राजबिंडा, मर्द तरुण शोभतोस. आतां तूं खरा पुरुषार्थशाली; आतां पुरुषाप्रमाणें वागायला लागलास.' असें त्याला प्रशस्तिपत्र जेथें तेथें मिळूं लागलें. पूर्वी आत्म्यावर श्रद्धा असतांना जें जें त्याला मंगल वाटे तें तें त्याला आतां नकोसें वाटे. पूर्वीचें सारें सोडून तो आतां निराळें जीवन जगूं लागला. त्याची आंतरिक धडपड बंद पडली होती. आरंभीं आरंभीं हें नवीन जीवन, हें फुलपांखरी जीवन जगतांना त्याला संकोच वाटे. मनांत बोंचणी असे; टोंचणी असे. परंतु पुढें सदसद्विवेकबुद्धीची

नांगी बोथट झाली एवढेंच नव्हे तर, ती जणूं उरलीच नाहीं. हळूहळू तो पूर्णपणें नवरंगी बनला. ओढूं लागला, पिऊं लागला, भोगूं लागला. प्रताप आत्यंतिक वृत्तीचा होता. 'जिकडे जाईल तिकडे तो वेगानें जाई. या नव्या विलासी जीवनाकडेहि तो बेफाम होऊन जाऊं लागला. भरधांव निघाला गडी. आंतला आवाज साफ गुदमरला. प्रभूची मुरली बंद झाली आणि लष्करांत गेल्यावर तर कळस झाला. लष्करांत सारेंच निराळें. लढायी जेव्हां नसते तेव्हां या लोकांना उपयोगी असा कोणताहि उद्योग नसतो. लढायीपर्यंत पोसायचें, लढायींत बळी द्यायचे. गणवेष, निशाणें, आपापलीं पथकें, पदकें, यांचाच अभिमान! सारें झकपक, लखलखीत. उमद्या घोड्यावर बसून कवायतीला जायचें. प्रतापचीं हत्यारें लखलखीत असत. तो तलवार फिरवी, बंदूक चालवी, दुसऱ्यांनाहि शिकवी. हाच तेथें नित्याचा उद्योग. आणि हा उद्योग संपल्यावर दारू, नाच, सारे प्रकार. दारू पिणें तर जणूं धर्म. रोजचें तें कर्तव्य. प्रताप चांगल्या मोठ्या हॉटेलांत जाई. तेथें नाचरंग, तमाशे असायचे. तो नाटकें पाही. रात्रीं मदिरा पिऊन मदिराक्षींना मिठ्या मारी. कधीं पत्ते खेळत बसे, तेथेंहि जुगार असे. केव्हां तरी रात्रीं झोंपे. असा हा लष्करी प्रताप होता. इतर लोकांना थोडी तरी लाजलज्जा असते. परंतु लष्करांत सर्रास परवानगी असते. असल्या बेछूट छाकट्या जीवनाची तेथें लाज न वाटतां उलट अभिमान वाटत असतो. 'आम्ही उद्यां रणांगणावर मरणारे; आम्हांला सारें भोगून घ्यायचा हक्क आहे. कधीं मरूं त्याचा काय नेम? म्हणून आम्ही असें वागतों. त्यांत काय वाईट आहे?' असें लष्करी मनुष्य म्हणतो.

मावश्यांकडे पुन्हां आलेला प्रताप हा असा होता. त्याला पाहून त्या आनंदल्या. म्हणाल्या,

'बरें झालें, दोन दिवस आलास. चांगलाच वाढलास. मिशाहि आल्या तुला. आणि हें काय? भिजलास वाटतें?''

'जरा पाऊस लागला.'

'अग रूपा, त्याला आधीं कढतकढत कॉफी आण.' प्रताप आपल्या जुन्या खोलींत गेला. त्यानें दुसरे कोरडे कपडे घातले, आणि रूपा कॉफी

घेऊन आली. त्यानें तिला ओळखलें. तिला तेथें पाहून त्याचे डोळे आनंदले.

‘ ये की आंत. ’ तो म्हणाला.

‘ तूं बरा आहेस प्रताप ? ’ तिनें विचारलें.

‘ तूं बरी आहेस ना ? त्यानें विचारलें.

‘ हो. हा तुझा आवडता साबण घे. हा टॉवेल घे. ’

‘ मी येथें आलों. तूं भेटलीस. मला किती आनंद होतो रूपा. ’ तो म्हणाला.

परंतु त्याच्या डोळ्यांची तिला भीति वाटली. ती तेथून चटकन् निघून गेली. परंतु त्याच्या मनांत पूर्वीच्या साऱ्या स्मृती जागृत झाल्या. तिचा आवाज, तिचीं पावलें दुरूनहि कानीं येतांच तो अस्वस्थ होई. त्याचें प्रेम उसळे. परंतु तें प्रेम पूर्वीचें नव्हतें. तें पवित्र, मधुर, सुंदर, गूढ असें तें प्रेम आज नव्हतें. पूर्वीं त्याला वाटे कीं, मनुष्य एकदांच प्रेम करूं शकतो. प्रताप-सारख्या व्यक्ती जणूं दुहेरी असतात. त्यांच्या एका देहांत जणूं दोन मनें असतात. एक भोगी तर एक त्यागी. एक मन धडपड करणारें, वर जाऊं पाहाणारें; तर दुसरें खालीं ओढणारें, गटारांत नेणारें. एक मन सर्वांच्या सुखाचा विचार करणारें, अवघाचि संसार सुखाचा करूं पाहाणारें, तर दुसरें मन केवळ अहं पाहाणारें, स्वतःपुरतें विचार करणारें. प्रतापचें एक मन त्याला म्हणे, ‘ तूं येथून जा, पडशील नि पाडशील ’ दुसरें मन म्हणे, ‘ येथें राहा. भीति कशाची ? भोग नि मग जा. ’

त्या दिवशीं एकादशी होती. मावश्या कीर्तनाला गेल्या होत्या. रूपाहि गेली. त्याला वाटलें होतें कीं, ती घरीं राहील. परंतु ती गेल्यामुळें तोहि कीर्तनास गेला. तो तिच्याकडे पाही. रूपा त्याच्याकडे पाहीना. परंतु प्रतापची दृष्टि आपल्याकडे आहे हें तिला कळत होतें. कीर्तन संपून सारीं घरीं आलीं. सायंकाळची वेळ होती. ती बाहेर केळीजवळ उभी होती. सायंकाळचा रक्तिमा पडून तिचा चेहरा किती सुंदर दिसत होता. आणि तो तिच्याकडे पाहात होता. जगांतलें सारें सौंदर्य तिच्या मुखमंडलावर येऊन नाचत आहे असें त्याला वाटलें. तो तिच्याजवळ [illegible]. त्यानें तिचे हात धरले. त्यानें तिच्या डोळ्यांकडे पाहिलें.



'हें काय?' असें म्हणून तिनें हात पटकन् ओढून घेतले.

ती निघून गेली. तो तेथेंच हात चोळीत बसला. नंतर दिवे लागले. ती पडवींत कांहीं काम करीत होती. मावश्या पुढल्या अंगणांत माळा जपत होत्या.

'रूपा, रात्रीं मी तुझ्या खोलींत येईन, तूं एकटी असशील. कडी नको लावूं.' तो म्हणाला.

'हें काय बोलतोस? असें नको मनांत आणूं. असें कांहीं करूं नकोस.' ती भीतीनें म्हणाली.

परंतु रात्रीं मावश्या केव्हां झोंपतात ह्याची तो वाट पाहात होता. आणि तो उठला. त्यानें तिचें दार हळूच ठोठावलें. ती जागी होती. तिचें सारें अंग थरारलें जणूं विद्युत् शरीरांत नाचत होती. ती काकडी काढत होती! तिनें दार हळूच उघडलें. त्यानें तिला एकदम उचललें. ती नको नको म्हणत त्याला अधिकच बिलगत होती, त्यानें तिला आपल्या खोलींत नेलें!

आणि पहांटे ती हळूच आपल्या खोलींत येऊन पडली. तो आपल्या

खोलींत होता. प्रताप विचार करूं लागला, ' परंतु असें सर्वांच्याच बाबतींत होतें, प्रत्येकजण असें करतो, असें न करणारा आमच्या लष्करी अधिकाऱ्यांत कोण आहे ? ' असें म्हणून निश्चितपणें तो झोंपला ! परंतु रूपाला झोंप आली नव्हती, ' ही सुखाची घटना कीं दुःखाची ? याचें पर्यवसान काय होणार ? ' याचा ती विचार करीत तळमळत होती.

सकाळ झाली. रूपा उठली. आज ती जरा खिन्न होती, गंभीर होती. दुसरा एक लष्करी तरुण, प्रतापचा मित्र तेथें उतरला. आज तिसरे प्रहरीं दोघे जायचे होते. रूपाला त्या नव्या तरुणानें पाहिलें. तो प्रतापला म्हणाला,

' तूं येथें वाटेंत कां उतरलास तें आतां समजलें. योग्य तेंच केलेंस. मी असतों तर, असेंच केलें असतें. भाग्यवान् आहेस तूं. किती मोहक आहे ती ! '

' क्षणाची गंमत. ' प्रताप म्हणाला.

आणि मावश्यांचा निरोप घेऊन तो जायला निघाला. ती बाजूला उभी होती. तो तिच्याकडे वळला. ती खोलींत गेली. शंभराची नोट कोऱ्या पाकिटांत घालून तो तिला म्हणाला,

' घे. शंभराची नोट आहे आंत. '

तिनें त्याचा हात दुःखसंतापानें दूर लोटला.

' घे. घेतली पाहिजे. ' असें म्हणून तिच्या हातांत ती नोट कोंबून तो गेला. आपलें कांहीं तरी चुकलें असें त्याला वाटलें. त्याला जरा चुकचुक वाटली. परंतु गाडींत बसल्यावर सिगारेटच्या धुरांत सारें विरून गेलें !



हें सारें त्याला आज कोर्टांत आठवलें. तो बेचैन झाला. ज्यूरीच्या खोलींत तो त्यांच्यांत बसला. ते सारे निर्णय घेणार होते. दोषी निर्दोषी ठरवणार होते. परंतु प्रताप मनांत म्हणाला, ' मी कोणाचा न्याय करूं ? माझाच न्याय व्हायची वेळ आली आहे. ' तो खटला चालला असतांना शेंकडों जुने प्रसंग त्याला आठवले. पहिल्या भेटींतले मधुरमंगल, निर्मल प्रसंग आणि दुसऱ्या भेटींतील तो भोग-प्रसंग. ती रात्र. आकाशांतील चंद्राचीं शिंगें टोंकदार दिसत होतीं. कृष्णपक्षांतील एकादशीची कोर !

आज रूपाची काय दशा? ती आतां दारू पिते! परंतु स्वस्थिति विसरण्यासाठीं पीत असेल.' ज्युरींतील लोक चर्चा करूं लागले.

'त्या व्यापाऱ्यानें खरें सुख अनुभवलें. अशी सुंदरी भोगल्यावर पुन्हां जगावें कशाला?' ज्यूरींतील एकजण म्हणाला.

'ती सुशिक्षित दिसते. चांगल्या घराण्यांतील असावी.' दुसरा कोणी म्हणाला.

प्रताप कांहीं बोलत नव्हता. त्याला हें सारें केव्हां आटपेल असें झालें होतें. शिकाऱ्यानें घायाळ केलेल्या पक्ष्यास पिशवींत भरलेलें असावें; तो पक्षी आंत तडफडत असतो. शिकाऱ्याला दया येते. घरीं केव्हां जाऊन याला लौकर मुक्त करूं असें त्याला वाटतें. तसें जणूं प्रतापला होत होतें. त्याची दया त्या प्रकारची होती.

'परंतु हीच बया मुख्य कारस्थानी दिसते. हिनेंच त्याला ठार केलें असावें. मोहनी घालणारी ही डाकीण आहे. तुम्ही योग्य तो न्याय द्या. समाजाचें हित डोळ्यांसमोर ठेवून न्याय द्या. हिनें पाकिटांत ते पैसे पाहिले. म्हणून ती पुन्हां आली. दिलें विष. रामधन आणि रमी दिसतांच त्यांनाहि हिनें वांटणी दिली. आणि शेवटीं विष!' असें सरकारी वकील म्हणाला.

'जिनें विष दिलें तिनेंच पैसे चोरले असले पाहिजेत. पूड दिल्याचें ती कबूल करते. उगीच कशाला कोणी विष चारील?'

'परंतु झोंपेसाठीं तिनें पूड दिली. त्या दोघांनीं हिला फसविलें. तीं दोघें मुख्य गुन्हेगार आहेत.'

'हिनेंच आजपर्यंत अनेकांना फसविलें असेल, केंसानें गळा कापला असेल. या जारिणींना आम्ही नीट ओळखतों. किती तरी असे खटले आजपर्यंत मीं चालविले आहेत.'

अशा चर्चा चालल्या होत्या. शेवटीं पुढील निर्णय ठरला:

१. रामधन दोन्ही गोष्टींत, चोरी आणि विष यांत अपराधी.

२. रमीहि तद्वतच दोन्ही गुन्हे करणारी.

३. रूपा फक्त चोरींत सामील. विष देण्यांत तिचा हात नाहीं. कारण झोंपेसाठीं म्हणून तिनें पूड दिली. तिच्यावर दया दाखविली जावी.

परंतु हा निर्णय जरा चमत्कारिक होता. तिनें जर झोंपेसाठीं पूड दिली असेल तर, तिनें चोरी कशी केली असेल ? चोरी केली असेल तरच तिनें विषहि दिलें असेल. तुम्ही चोरी केली म्हणतां आणि विष मात्र दिलें नाहीं तर झोंपेची पूड दिली म्हणतां. ही विसंगति. प्रताप म्हणाला, 'मला ती संपूर्णपणें निर्दोषी वाटते.'

'तिनें पैसे घेतले नाहींत. आंगठी त्यानेंच दिली. तर मग ती विष कशा-साठीं देईल ?' पुन्हां कोणी बोलला.

'चोरी करायचा हेतु नसतां विष दिलें असें म्हणावें.' एकानें सुचविलें.

'परंतु 'दया करा' असें पुढें जोडा.' व्यापारी म्हणाला.

'निरपराधी आहे असेंच म्हणा ना.' प्रतापनें सुचविलें.

'अहो, तिचा चोरीचा हेतु नाहीं असें म्हटलें म्हणजे तोच नाहीं का अर्थ निघत ?'

'बरें बरें; चला आतां आटपा.' सारे म्हणाले.

ज्यूरीच्या लिहिण्यांत महत्त्वाचे शब्द सर्वांच्या घाईमुळें घालायचे राहिले. 'चोरीचा हेतु नव्हता, त्याप्रमाणेंच प्राण घेण्याचाहि नव्हता' असें म्हणायला हवें होतें. परंतु 'प्राण घेण्याचाहि नव्हता' हे शब्द घालायचे राहिले. सारा मूर्खपणाचा कारभार. जो तो घाईत. ज्यूरी, न्यायाधीश कोर्टांत आले. सारे गंभीर झाले. न्यायाधीशांनीं निकाल वाचला :

१. रामधन : आठ वर्षें
२. रमी : चार वर्षें
३. रूपा : तीन वर्षें
} सर्वांना सक्तमजुरी नि काळें पाणी.

प्रताप उठून म्हणाला, 'रूपा निर्दोषी आहे. तिनें चोरी केली नाहीं. तिनें पूड दिली ती झोंपेची समजून.' न्यायाधीश म्हणाला, 'परंतु प्राण घेण्याचा तिचा हेतु नव्हता असें तुम्हीं म्हटलें नाहीं, येथें लिहिलें नाहीं.'

'तें चुकीनें राहिलें. घाई झाली. तुमचा निर्णय हास्यास्पद ठरेल. चोरी जर केली नाहीं; तर ती विष कशाला देईल ? पूड दिली; परंतु प्राण घेण्याचा तिचा हेतु नव्हता. हा अर्थ यांतून निघतो.' प्रताप म्हणाला.

'तें स्पष्ट केलें पाहिजे होतें. मला उगीच अर्थ काढतां येणार नाहीं. ज्यूरी सर्वांना सोडून देते नि न्यायाधीशहि सोडूं लागले असा गवगवा

व्हायचा. तुम्ही लिहिलें आहे तदनुरूप सारें झालें पाहिजे. तुम्ही गुन्हे ठरवलेत त्याप्रमाणें शिक्षा. तुम्ही दया करा म्हटलंत म्हणून मी तिला कमी शिक्षा देत आहें. चला. न्या त्यांना.'

'कांहीं करतां नाहीं का येणार? ती खरेंच निरपराधी आहे. निरपराध्याला शिक्षा नको.'

'परस्परविरुद्ध तुम्हां सर्वांचें लिखाण झालें आहे. परंतु आतां तें वज्रलेप. तुम्ही अपील करा. प्राण घेण्याचा हेतु नव्हता हे शब्द तुम्ही त्या वेळेस कां जोडले नाहींत?' न्यायाधीश म्हणाला. हत्यारी पोलीस कैद्यांना नेऊं लागले. रूपा रडूं लागली.

'मी निरपराधी आहें.' ती म्हणाली.

'या सटवीमुळें आम्हांला शिक्षा.' तीं दुसरीं दोघें म्हणालीं. रूपानें प्रतापकडे केविलवाण्या दृष्टीनें पाहिलें, तिची बाजू घेऊन तोच शेवटीं जरा बोलला. तिनें का त्याला ओळखलें होतें? नाहीं.

हत्यारी पोलीस आरोपींना घेऊन चालले सायंकाळची वेळ होती. ती भुकेनें व्याकुळ झाली होती. रस्त्यांत कोणी खात होतें. तिला वाटलें मागावा मूठभर चिवडा. आणि शिक्षा झाली! कोठें पाठवणार? परप्रांतांत कीं अंदमानांत? निराशेनें ती रडत होती. ज्यांनीं तिला अपराधी ठरविलें तेच लोक त्या वेश्यागारांत खेटे घालणारे! काय विचित्र प्रकार! हळूहळू तिचें दुःख गोठलें. ती जणूं दगडाची झाली. इतक्यांत तिला पांच रुपये कोणी तरी आणून दिले. वेश्यागाराच्या मालकिणीनें तिला ते पाठविले होते!

'मला ब्रेड घेऊन द्या.' ती पोलिसांना म्हणाली. त्यांनीं तिला घेऊन दिला आणि तुरुंगाच्या दाराशीं सारीं आलीं. तेथें दुसऱ्या तुरुंगांतून नवीन कैद्यांची एक टोळी आली होती. ते तेथें बसलेले होते. त्यांत कोणी तरुण होते, कोणी म्हातारे. कोणाच्या दाढ्या वाढलेल्या, तर कोणाच्या डोक्याचे गोटे केलेले. अंगावर ते विद्रूप कपडे. तोंडावर दुःख, निराशा, धूळ. कैद्यांना अशा रीतीनें वागवण्यांत येतें कीं आपण स्वाभिमानी माणसें आहोंत असें त्यांना वाटूं नये. त्यांना टोपी देतील तिला कसलाहि आकार नसतो! सारा माणुसघाणा प्रकार.

परंतु त्या आलेल्या कैद्यांत कोणी अट्टल काळा टोपी कैदी होते. रूपाला बघतांच एकजण म्हणाला,

‘ अरे ती बघा फांकडी. आहे की नाहीं नंबरी नाणें ? ’

‘ नमस्कार सुंदरी. ’ दुसरा म्हणाला.

‘ अग, इकडे ये. मीच तुझा खरा यार. मला ओळखतेस कीं नाहीं ? ’ एकानें तिला खडा मारला. इतक्यांत त्या टोळीवरचे पोलीस आले.

‘ हरामखोर, पाजीपणा करतोस ? असें म्हणून एका पोलिसानें त्याला ठोसा मारला.

‘ ही मंडळी येथें कां ? ’ सुभेदारानें विचारलें.

‘ कोर्टांतून आली आहेत. ’

‘ आंत न्या त्यांना लौकर. ’

आणि रामधन व रमी, रूपा यांना पुन्हां त्या औरत-कोठड्यांत नेण्यांत आलें.

‘ काय झालें रूपा ? ’ म्हातारीनें विचारलें.

‘ सर्वनाश ! तीन वर्षें शिक्षा. ’

‘ तीनच वर्षे ना ? आतां जातील. सात आठ महिने सूट मिळेल. तूं देखणी आहेस. अधिक सुद्धां मिळेल. ये. रडूं नकोस. रडायचें कशाला ? ’

रूपा त्या खोलींत गेली नि पडून राहिली. रात्र झाली. पहारेवाल्यांची आलबेल सुरू झाली. रूपा रडत होती. आकाशांत तारे थरथरत होते.

●●●

प्रतापरावाला खटल्याचा निकाल लागल्यावर अत्यंत वाईट वाटलें. आपण ते शब्द वगळले ही केवढी चूक केली ! इतरांचे एक राहो; परंतु आपण तरी अधिक काळजीपूर्वक काम केलें पाहिजे होतें असें राहून राहून त्याच्या मनांत येई. प्रतापनें पुन्हां त्या न्यायाधीशाला गांठलें. काय करतां येईल म्हणून विचारलें.

‘ तुम्ही दादासाहेब बॅरिस्टरांकडे जा. अपील करतां येईल. ’ असें म्हणून त्यानें घड्याळाकडे पाहिलें.

प्रतापराव आभार मानून निघाला. त्या बॅरिस्टराच्या घरीं तो आला. बॅरिस्टर कामांत होते.

‘ मला थोडें तुमच्याजवळ बोलायचें आहे. ’

‘ बरें, बोला. ’

‘ एका निरपराधी बाईला सोडवयाचें आहे. तिला विनाकारण शिक्षा झाली आहे. ’

‘ बरें. ’

‘ वरिष्ठ कोर्टाकडे अपील करायचें आहे. तुम्ही यांत लक्ष घाला. मी होईल तो खर्च करीन. ’ असें म्हणून त्यानें त्या खटल्याची साग्र हकीगत सांगितली. ...

‘ आतां मी कामांत आहें. तुम्ही परवां या. मी विचार करून ठेवीन.’

प्रतापराव निघून गेला नि सकाळीं जिच्या आईनें चिठ्ठी पाठविली होती त्या तरुणीच्या घरीं तो आला. तिचे वडीलहि आज घरीं होते. ते लष्करांत मोठे अधिकारी होते. स्वभावानें ते दुष्ट होते. सैनिकांना जरा कांहीं चुकतांच फटक्यांची शिक्षा ते देत. कांहीं विशेष कारण नसतां गोळी घालायचे, फांशीहि द्यायचे, ते श्रीमंत होते. सत्तांध होते. त्यांना कोणाची पर्वा नसे.

‘ आलेत ज्यूरींत काम करून ? निर्दोषी सोडलें असेल गुन्हेगारांना ! समाजाचा पाया उखडणें हें तुमचें काम. निरपराध्यांना शिक्षा आणि अपराध्यांची मुक्तता. ’ असें म्हणून तो लष्करी अधिकारी रुबाबांत हंसला.

‘ समाजाचा पाया उखडणारे ! बरोबर, अगदीं बरोबर. नवीन लोकांचे हे लोकशाही प्रकार. म्हणे ज्यूरी हवी. कशाला हवी ज्यूरी ? न्यायाधीशापेक्षां का ज्यूरींतील लोकांना कायदा अधिक कळतो ? ’ तेथील दुसरे एक लठ्ठ भारती गृहस्थ म्हणाले.

‘ बाबा, तुमच्या चर्चा राहूं देत. प्रतापरावांना भूक लागली असेल. ते थकले आहेत. त्यांना आधीं जेऊं दे. ’ मुलगी म्हणाली.

‘ तुम्ही सिनेमाला नाहीं गेलांत ? ’ प्रतापनें विचारलें.

‘ तुम्ही नाहीं बरोबर, मग जाण्यांत काय मौज ? ’ ती म्हणाली.

तो तेथें मनाला विरंगुळा मिळेल या आशेनें आला होता. परंतु त्याला तेथें सारें विद्रूप दिसूं लागलें. तेथें सुखलोलुपता, स्वार्थ, यांची घाण होती. त्याला तिटकारा वाटला. त्यानें तिच्याकडे पाहिलें. पूर्वीं ती त्याला अभ्यंग

दिसे, निर्दोष सौंदर्याची मूर्ति वाटे. चांदण्यांत सारें सुंदर दिसतें. परंतु एकदम सूर्यप्रकाश आल्यावर सारे दोष, साऱ्या उणीवा दिसूं लागतात. आज त्याचें तसें झालें होतें. आज ती त्याला सुंदर दिसली नाहीं. तिच्या तोंडावर त्याला थोड्या सुरकुत्याहि दिसल्या, बोटांचीं नखें वाढलेलीं दिसलीं. ती तरुणी त्याच्याजवळ कांहीं तरी बोलूं इच्छीत होती.

‘ टेनीस खेळणें चांगलें कीं नाहीं हो ? मघां आमचा वाद चालला होता.’ तिनें विचारलें.

‘ मीं त्याचा कधीं विचारच केला नाहीं. ’ तो म्हणाला.

‘ तुम्ही आईकडे येतां ? ’ तिनें सूचक विचारलें.

‘ येतों. ने मला. ’ तो म्हणाला.

ती त्याला आईकडे नेत होती. जातांना परिचयात्मक स्वरांत ती म्हणाली,

‘ प्रताप, आज तुला कांहीं तरी होत आहे. मला सांग. ’

‘ कांहीं तरी होत आहे ही गोष्ट खरी. ’ तो म्हणाला.

‘ मग मला नाहीं सांगत ? मी कोणी नाहीं ना ? ’

‘ आज नाहीं सांगत. कृपा करून आज कांहीं विचारूं नकोस. ’

‘ नाहीं ना सांगत ? नाहीं ? बरं बरं. ’ ती रागावून रुसून बोलली.

‘ आज तें सारें सांगण्यासारखें नाहीं. मलाच अद्याप त्या साऱ्या प्रकरणावर विचार करायचा आहे. ’

तीं दोघें आईच्या प्रशस्त खोलींत आलीं. त्या तरुणीची आई तेथें एका डॉक्टराजवळ बसली होती. प्रतापला तिटकारा आला. आईनें मुलीला जायला सांगितलें.

‘ जातांना मला भेटल्याशिवाय नका हं जाऊं. ’ ती प्रतापला लाडिक-पणानें, प्रेमाच्या हक्कानें जणूं बोलली.

‘ कोर्टांतून आला प्रताप ? कंटाळलास ना ? ’ मातेनें विचारलें.

‘ हो. ’ तो म्हणाला.

‘ तुझें तें चित्र झालें का रे पुरे ? ’

‘ मीं अलीकडे चित्रकलेचा नाद सोडून दिला आहे. ’

'कां? अरे, तुला कलेची देणगी आहे. कोणी बरें मला सांगितलें कीं तूं उत्कृष्ट कलावंत होशील म्हणून? आठवत नाहीं. एकूण तूं चित्रकला सोडून दिलीस? अरे, कलेशिवाय जीवनांत काय राम?'

ही माता थापा मारीत आहे हें प्रतापनें ओळखलें. कोणीहि तिला कांहींहि सांगितलेलें नव्हतें. ती खोटें बोलत होती. प्रतापची वृत्ति आज ठीक नाहीं असें पाहून ती आतां डॉक्टरांकडे वळली.

'मग डॉक्टर, सांगा ना तें नवीन नाटक कसें आहे तें. तुमचें मत स्पष्ट सांगा.' जणूं त्या डॉक्टराचें मत म्हणजे शेवटचें मत होतें! ते डॉक्टर कलेवर बोलूं लागले. नाटकांतील कलेवर मग प्रवचन सुरू झालें. ती माता त्या नाटकाचें समर्थन करूं लागली. प्रताप ती चर्चा ऐकत होता. त्या चर्चेंत त्या दोघांचा आत्मा नव्हता. तीं दोघें उगीच बोलायचें कांहीं तरी म्हणून बोलत होतीं. सुसंस्कृतपणा दाखविण्यासाठीं बोलत असतील. घशाला व्यायाम म्हणून तीं बोलत होतीं. आतां सूर्यास्त होत आला. शेवटचे किरण खिडकींतून आंत आले. ते त्या मातेच्या तोंडावर पडत होते. तिनें घंटा वाजवली. एक नोकर आंत आला.

'तो खिडकीचा पडदा कर रे नीट.'

सूर्यकिरणांमुळें तिच्या तोंडावरच्या सुरकुत्या दिसूं लागल्या. पुन्हां ती बोलूं लागली,

'काव्याशिवाय गूढवाद म्हणजे केवळ भारूड; आणि गूढवादाशिवाय काव्य म्हणजे प्राणाशिवाय कुडी.' तिनें पुन्हां त्या नोकराकडे पाहिलें.

'अरे मूर्खा, तो पडदा नव्हे, हा.' ती म्हणाली.

नोकरानें तो दुसरा पडदा नीट केला.

'अरे, त्या बाजूला सार, टोणपा आहेस तूं.'

'त्या म्हातारीला हवें आहे तरी काय?' असें तो नोकर नक्की मनांत म्हणाला असेल. तो नोकर गेला. आणि आतां क्रान्ति-उत्क्रान्तीची चर्चा सुरू झाली!

'डॉक्टर, डार्विनच्या म्हणण्यांतहि तथ्य आहे नाहीं? परंतु जीवनार्थ कलहावर त्यानें फारच जोर दिला. प्रताप, वंशपरंपरा गुणधर्म येतात या सिद्धान्तावर तुझा विश्वास आहे?'

‘ नाहीं. ’

‘ प्रताप, माझी मुलगी तिकडे तुझी वाट पाहात असेल. तुम्हां दोघांना पुष्कळ बोलायचें असेल. जा बोला. ’

आपल्याला हाकलण्याची म्हातारीनें युक्ति काढली असें त्याला वाटलें. तो तेथून बाहेर पडला. त्या मुलीला तो भेटला.

‘ प्रताप, आज ज्यूरींतील कामामुळें तुला त्रास झाला. होय ना ? ’

‘ हो. आज माझें मन खिन्न आहे, दुःखी आहे. तें रोजच्यासारखें नाहीं. ’

‘ कां बरें राजा ? ’

‘ तें सांगतां नाहीं येत. ’

‘ आपण खरें तें एकमेकांस सांगितलें पाहिजे असें तूंच म्हणाला होतास.. ’

‘ परंतु प्रत्यक्षांत सारें जमत नाहीं. आपण का सारीं चांगलीं माणसें असतों ? कापराला पाठ-पोट नाहीं, त्याप्रमाणें सज्जनांना आंत-बाहेर नाहीं. परंतु ज्यांना आपलें सारें जीवन उघडें करून दाखवतां येईल अशीं किती माणसें या जगांत असतील ? मी तरी फारसा चांगला नाहीं. मी सारें कसें कोणाला सांगू ? मी सारें खरें सांगू शकत नाहीं. ’

‘ प्रताप आपण सारींच वाईट आहोंत. तूंच कांहीं एकटा वाईट नाहींस. आपण सारीं माणसेंच आहोंत. ’

‘ जाऊं दे. मी आज निराश, निरुत्साही आहें. अधिक काय सांगू ? मी नेहमीं आनंदी असतों असें नाहीं. परंतु आज तर नाहींच नाहीं. ’

‘ तूं पत्ते खेळायला येतोस ? ’

‘ मला जायचें आहे. ’

तिनें त्याचा हात किती तरी वेळ आपल्या हातांत ठेवला होता. शेवटीं ती म्हणाली,

‘ प्रताप, तुला जें महत्त्वाचें वाटतें तें तुझ्याविषयीं आपलेपणा वाटणाऱ्यासहि महत्त्वाचें नसेल का वाटत ? आज तूं नाहीं सांगत. उद्यां येशील ? ’

‘ उद्यांहि बहुधा वेळ होणार नाहीं. मी जातों. क्षमा कर. ’ असें म्हणून प्रताप गेला. ती गॅलरींत उभी होती. ‘ हा आपणांस सोडून देणार का ? मी त्याला नाहीं का आवडत ? गोष्टी इतक्या थरावर येतील असें नव्हतें वाटलें. ’ असे विचार तिच्या मनांत चालले होते. ‘ गोष्टी इतक्या थरावर

म्हणजे ग काय ' असें कोणी तिला विचारलें असतें तर मात्र तिला नीट कांहीं सांगतां आलें नसतें.

तो विचार करीत घरीं येत होता. त्याला सारें जग घाणीचें माहेरघर वाटलें. ' शी, सारी घाण, घाण ' असें तो म्हणत होता. ती रूपा त्याच्या डोळ्यांसमोर आली. पूर्वीची ती पहिली भेट त्याला आठवली. ती निर्मळ सुंदर, प्रेमळ रूपा ! ती रूपा आज वेश्या होती ! आणि तो ? तोहि एका काळीं ध्येयार्थी होता. उदारमतवादी होता. परंतु आज तो कसा होता ? तिकडे त्या एका अधिकाऱ्याच्या पत्नीजवळ त्यानें कांहीं तरी करार केला होता. इकडे ही तरुणीहि त्याला बद्ध करूं पाहात होती. आज तो पुन्हां जमीनदार झाला होता. आईची सारी इस्टेट त्याला मिळाली होती. आणि त्या दोन्ही मावश्या मेल्यामुळें त्यांचीहि इस्टेट आतां त्यालाच मिळाली होती. जमीनदारी म्हणजे केवळ अन्याय असें तो पूर्वी म्हणे आणि आज ?

जमीनदारी कां सोडायची ? रूपाचें काय करायचें ? तिला का मी संकटांत सोडून देऊं ? मीं तिच्यावर प्रेम केलें होतें. मीं तिला शंभराची नोट दिली. पैसे देऊन का पापाचें प्रायश्चित्त घेतां येतें ! आजहि मी तिला खूप पैसे देऊं शकेन. परंतु त्यानें काय होणार आहे ? माझा उद्धार होईल का ? तिचा होईल का ? '

आणि पैसे तरी कोणाचे ? आईच्या, मावश्यांच्या इस्टेटीचे. मी केवळ लफंग्या आहें. दांभिक आहें. मी जगाची फसवणूक करीत आहें. जग मला चांगलें म्हणत आहे. परंतु मी तसा आहे का ? मी स्वतःला चांगलें म्हणूं शकेन का ? मला स्वतःची शिसारी येत आहे.

तो घरीं आला. त्या खोलींत तो बसला. तेथील सुखसंभाराकडे त्याचें लक्ष नव्हतें. तो जगाला विटला होता, कारण त्याला स्वतःचाच वीट आला होता. स्वतःच्या तिरस्काराची प्रतिक्रिया जगाचा तिरस्कार करण्यांत होत होती. आपण नीच आहोंत असें स्वतःशीं कबूल करण्यांत त्याला एक प्रकारचा शान्त, दान्त आनंद होत होता. आज जणूं पुन्हां आध्यात्मिक अभ्यंगस्नान त्याला घडत होतें. खळमळ दूर होत होता. हृदय हेलावत होतें. आत्मा जागा झाला. मंजुळ मुरली अंतरीं वाजूं लागली. कोपऱ्यांत मृतवत् पडलेली सदसद्विवेकबुद्धि पुन्हां वर मान करून अंतरंगीं उभी

राहिली. आतांपर्यंत त्याला आंतरिक जीवन जणूं नव्हतें. गेलीं आठ-दहा वर्षें केवळ बाह्य जीवन तो जगत होता. देहाचें, इंद्रियांचें जीवन! आत्मानंद दूर राहिला होता. परंतु आज हृदयांत प्रचंड वादळ घों घों करून उठलें. प्रचंड लाटा उठल्या. प्रचंड खळबळ सुरू झाली. डबक्यांप्रमाणें—सांचीव डबक्याप्रमाणें बनलेल्या त्याच्या जीवनांत वेगाची हालचाल सुरू झाली. डबक्यांत निर्मळता येऊं लागली. सारा कचरा दूर झाला. आयुष्यांत कितीदां तरी अशीं घुसळणें होतात. पुनःपुन्हां जमलेली घाण दूर होते. शिक्षण संपल्यावर प्रथम प्रथम साधी नोकरी करूं लागला. पुढें तो लष्करांत गेला. लढायीच्या वेळेस बलिदान व्हावें अशीहि त्यानें इच्छा केली होती. तो मेला नाहीं. पुढें त्यानें लष्करी पेशा सोडला. त्यानें कलांचा अभ्यास सुरू केला. असें किती तरी जीवन निघून गेलें. परंतु खरें जीवन अद्याप पुढें होतें. त्याची सदसद्विवेकबुद्धि आज चांगलीच जागी झाली. ध्येयार्थी जीवन आणि चाललेलें जीवन यांत त्याला अपार अंतर दिसलें. किती तरी विरोध दिसला. विसंवाद दिसला. हें अतर मला काटतां येईल का? पूर्वींहि एके काळीं परिपूर्णतेकडे माझे डोळे होते. परंतु मी पडलों, अधः-पतित झालों. आतां पुन्हां परिपूर्णता दिसत आहे. मी पुन्हां चढू पाहात आहें. आणि पुन्हां घसरलों तर? पुन्हां प्रयत्न कर. अरे असा पुनःपुन्हां पडणारा तूं का एकटाच आहेस? सारी मानवजात अशीच धडपडत आहे. नदी धडपडत वेडीवाकडी जात पूर्णतेच्या सागराकडे जात आहे. तूं आज जागा झाला आहेस. असेंच इतरहि होतात. तूं जागा झालास याची धन्यता मान. तूं स्वतःला तिरस्कृत नको समजूं. जागृति येणें हेंहि भाग्याचें, सुदैवाचें चिन्ह समज.

प्रताप पुन्हां चढण चढायला, कामक्रोधांचें दुर्लंघ्य पर्वत ओलांडून पली-कडील अनंताचें दर्शन घ्यायला हिंमतीनें उभा राहिला. तो मनांत म्हणाला, ‘ सर्वांना मी सत्यकथा सांगेन. अतःपर दंभ नको. मला प्रेमांत ओढूं पाह-णाऱ्या त्या तरुणीला मी सांगेन कीं, मी व्यभिचारी आहें आणि ती रूपा, तिच्याशीं मी लग्न लावीन. ती वेश्या नाहीं. मी सारी जमीनहि वांटून देईन. मी रूपाला सांगेन कीं मीं तुला फसविलें. मी तिची क्षमा मागेन. तिला मी सुखी करीन. जरूर तर तिच्याजवळ मी लग्नहि करीन.’ असे

विचार तो मनांत करीत होता. त्यानें ईश्वराला हात जोडले. तो म्हणाला, ' प्रभो, मला हात दे. मी तुझें लेंकरूं. मला पुन्हां पडूं देऊं नकोस. मला नीट मार्गाला लाव. मला शिकव. प्रकाश दे. ये, देवा, माझ्या हृदयांत ये आणि पुन्हां तेथून जाऊं नकोस मला शुद्ध कर, निर्मळ कर. ' त्यानें अशी मनःपूर्वक प्रार्थना केली. त्याच्या हृदयांतील देव जागा झाला होता. त्याला आतां जरा हलकें वाटलें. आपण पुन्हां मुक्त, स्वतंत्र झालों, मोहांच्या, विकारांच्या, इंद्रियांच्या मगरमिठींतून सुटलों असें वाटून त्याच्या तोंडावर सात्त्विक प्रभा पसरली. त्याचे डोळे सौम्य स्निग्ध नि शान्त दिसूं लागले. त्याचें हृदय आनंदानें भरभरून आलें. जीवनांत पुनरपि सत्य आलें. श्रद्धा आली, सच्चिदानंद आला. जें जें परमोच्च आहे, उत्कृष्ट आहे तें तें करण्याचा मी प्रयत्न करीन असा त्याला आत्मविश्वास वाटला. जें जें शक्य तें तें मी सारें करीन असें तो मनांत म्हणाला. त्याचे डोळे घळघळूं लागले. ते अश्रु आनंदाचे होते नि दुःखाचेहि होते. आत्मजागृति आली म्हणून आनंदाचे अश्रू येत होते; इतके दिवस आपण असे कसे केवळ तमोगुणी बनलों, अज्ञानाच्या, मोहाच्या झोंपेंत गुंगून राहिलों, असें मनांत येऊन, स्वतःचा अधःपात डोळ्यांसमोर येऊन दुःखाचे अश्रूहि येत होते. गंगा-यमुनांचें पावित्र्य त्या उभयविध अश्रूंत होतें.

त्याला आतां उकडत होतें. त्यानें खिडकी उघडली. थंड गार वारा आला. बाहेर शान्त, स्वच्छ चांदणें पडलें होतें. बागेंतील झाडांच्या छाया दिसत होत्या. एकमेकांत गुंतलेल्या छाया, पलीकडे बागेची काळी भिंत दिसत होती. तो बघत राहिला. ही सृष्टि किती सुंदर, निर्मळ असें तो मनांत म्हणत होता. ' प्रभो, आज किती दिवसांनीं हा आनंद मी भोगीत आहे. किती मोकळें, प्रसन्न मला वाटत आहे. ' असें तो कृतज्ञतापूर्वक हात जोडून म्हणाला. त्याची जणूं समाधि लागली.

●●●

# २

प्रतापनें आतां साधेपणानें राहायचें ठरविलें. एवढें मोठें घर कशाला ? नोकरचाकर कशाला ? घर विकूनच टाकलें तर ? परंतु जर रूपाशीं लग्न केलें तर राहायला नको का ? सध्यां भाड्यानें दिलें तर नाहीं का चालणार ? किती तरी भाडें येईल ! आपण लहानशी खोली घेऊन राहावें. असे विचार त्याच्या मनांत येत होते. त्यानें घरांतील मोलकरणीस बोलावलें.

' हें घर मी भाड्यानें देऊं इच्छितों. तुम्ही वाटलें तर माझ्या बहिणी-कडे जा. आतां मी एकटा कोठें तरी राहीन. '

' मी कोठें जाऊं ? मी या घरांत चाळीस वर्षें काम करीत आहें. तुझी आई मेली. तिच्या आत्म्याला काय वाटेल ? या घरांत भाडेकरी ? तुला का भीक लागली आहे ? भिकाऱ्यासारखा का एखाद्या खोलींत राहाणार ? मी या घरांतून जाणार नाहीं. मी हें तुला भाड्यानेंहि देऊं देणार नाहीं. तूं याच घरांत राहा. घरीं जेवत जा. तुला झालें आहे काय ? लग्न कां नाहीं करीत ? नीट संसार कर. म्हणे घर विकावें, भाड्यानें द्यावें ! तें कांहीं नाहीं. मी तुझी काळजी घेईन. तुझ्या आईनें मला सांगितलें आहे. ' ती म्हातारी मोलकरीण म्हणाली.

ती मोलकरीण मोठमोठ्यानें बोलत होती. तो मंद स्मित करीत होता. शेवटीं म्हणाला,

‘ बरें तर. कांहीं दिवस राहूं दे घर. जशी तुझी इच्छा. ’

‘ असा शहाणा हो. डोक्यांत राख घालून का बोवाजी व्हायचें आहे ? कशाला कमी नाहीं. बापाची जमीन वेड्यासारखी देऊन टाकलीस. आतां आईची, मावश्यांची आहे, ती तरी सांभाळ. नीट नांवलौकिक मिळव. ’ उपदेश करून ती कामाला निघून गेली.

प्रतापराव रूपाला भेटूं इच्छीत होता. परवानगी काढण्यासाठीं एका सरकारी अधिकाऱ्याला भेटणें जरूर होतें. म्हणून तो बाहेर पडला. तो अधिकारी घरांतच होता.

‘ काय आहे काम ? ’ त्यानें विचारलें.

‘ मला एका कैद्याला भेटायचें आहे. ’

‘ शिक्षा लागली आहे का ? ’

‘ हो. मी अपील करणार आहें. ’

‘ अपिलाचें होईल तेव्हां होईल. तो कैदी तुरुंगांत असेल. ठराविक दिवशीच कैद्यांची भेट घ्यायला येते. ’

‘ तें मला माहीत आहे. परंतु मला आजच भेट हवी आहे. तुम्ही चिठ्ठी दिलीत तर काम होईल. ती एक निरपराधी स्त्री आहे. ’

‘ अहो, तुम्हांला सारी दुनिया चांगली दिसते. परंतु तशी वस्तुस्थिति नसते. गुन्हे फार वाढले आहेत. कालच एक खटला चालला होता. एका तरुणानें चटयांचीच चोरी केली. त्याचा एक जिनगर दोस्त होता. त्या जिनगराच्या मदतीनें त्यानें कुलूप फोडलें आणि चटया लांबविल्या. काय करायचें सांगा. तो जिनगर कच्च्या कैदेंतच मेला. या पोराला तीन वर्षांची शिक्षा झाली. घरें फोडायचीं, दुकानें फोडायचीं ! भयंकर प्रकार. ’

‘ तो तरुण का बेकार होता ? ’

‘ संपांत त्याची नोकरी गेली. झाला बेकार. यांना येतां जातां संप हवेत. बेकार होतात. मग चोर बनतात. ’

‘ बेकारांना जर सरकार काम देईल तर ते चोर कशाला होतील ? बेकारांना धंदा द्या. त्या तरुणानें चार चटया चोरल्या. त्याला खायला नसेल. तुम्हां

आम्हांसहि जर खायला मिळालें नाहीं तर तुम्ही आम्हीहि चोऱ्या करूं. चटयांच्याच नाहीं तर मोठमोठ्या करूं. बिचारा तरुण ! तीन वर्षें तुरुंगांत तो खितपत पडणार ! आणि तो जिनगर तो मेलाहि. बरेच दिवस खटला चालला असेल. त्या कोठडींत तो आजारी पडला असेल. महाराज, तो तरुण समाजाला धोका देणारा कीं त्या तरुणाला अशी शिक्षा देणारे आपण अधिक धोकेबाज ? '

' जाऊं द्या. तुम्ही उदारमतवादी दिसतां. तुम्हांला भेटीची परवानगी हवी आहे. होय ना ? '

' होय. ती स्त्री निरपराधी आहे. मी तिच्याशीं लग्नहि करीन. '

' तुम्ही बडे जमीनदार ना ? '

' जमीनदारीचेंहि पाप मी दूर करणार आहें. आणि मी जमीनदार असलों म्हणून काय झालें ? '

' तसें माझें कांहीं म्हणणें नाहीं. पसंत पडेल तेथें लग्न करावें.'

' परवानगी देतां ? '

' बसा देतों ? '

' त्यानें चिठ्ठी लिहिली. '

' मला आणखीहि एक सांगायचें आहे. यापुढें ज्यूरींत मी राहूं इच्छीत नाहीं. कोणी कोणाचा न्याय करावा ? आपण सारेच अन्यायी असतों. मी तरी आहें. आपण निष्पाप आहोंत, आपल्या हातून अन्याय घडला नाहीं असें ज्याला वाटत असेल त्यानें दुसऱ्याचा न्याय करावा. '

' तुम्ही अर्ज द्या. तुमचीं कारणें लिहा. तीं कारणें सरकारला पटलीं तर तुमचें नांव काढून टाकण्यांत येईल. न पटलीं आणि तुम्ही न आलांत तर तुम्हांला दंड होईल, समजलें ना ? '

' मी अर्जबिर्ज करणार नाहीं. तुमच्या कानांवर गोष्ट घातली आहे. '

' ठीक तर. आणखी आहे कांहीं काम ? '

' आज तरी नाहीं. येतों. आभारी आहें. '

प्रतापराव निघून गेला. त्या अधिकाऱ्याची पत्नी बाहेर येऊन म्हणाली, ' कोण आला होता हो ? '

'अग तो आबासाहेबांचा प्रतापराव. विक्षिप्त आहे. वाटेल तें बोलत होता. म्हणे त्या कैदी बाईशीं मी लग्न लावणार आहें. म्हणे मीच तिला मागें भुलवलें!'

'खरें कीं काय?'

'म्हणत तरी होता. आजच्या तरुणांत कांहीं तरी विकृतिच आहे. त्यांना प्रतिष्ठा नाहीं, कुलाभिमान नाहीं. वाटेल तेथें लग्नें करतील. श्रीमंतांचीं मुलें क्रान्तिकारक होतात. फांशी जातात. कांहीं तरी विकृति जडली आहे या नवतरुणांना.'

'परंतु हा प्रतापराव कांहीं तितका तरुण नाहीं आतां. तुम्ही त्याला जाऊं कां दिलेंत? मींहि त्याची विकृति पाहिली असती. पुन्हां आला तर त्याला भेटेन. ध्यानांत ठेवा. नाहीं तर विसराल.'

'अग अशांना भेटून काय उपयोग? या लोकांना कांहीं तरी बंधन घातलें पाहिजे. सरकारी कामांत पदोपदीं अडथळे आणतील. समाजांतहि बखेडे माजवतील. या लोकांचा धोका वाटतो. फार भयंकर असतात हे प्राणी.'

'हे भयंकर प्राणीहि कधीं कधीं गोगलगाय होतात. आतां हाच बघा. ज्याची तुम्हांला भीति वाटते, तो धोकेबाज वाटतो, तो त्या कैदी बाईशीं लग्न करायला तयार होतो. खरें ना? मला भेटायचें आहे या प्रतापरावाला. चला, आपल्याला जायचें आहे ना एके ठिकाणीं. उठा.'

त्या नवराबायकोचीं अशीं बोलणीं चाललीं होतीं. तिकडे प्रताप सरळ तुरुंगांत गेला. अधिकाऱ्याला भेटला. ती चिठ्ठी त्यानें दाखविली.

'आज आतां उशीर झाला आहे. उद्यां दहा वाजतां या. तुम्हांला येथें जवळच्या खोलींतहि मुलाखत घेतां येईल. उद्यां या. माफ करा.' तुरुंगाधिकाऱ्यांनीं सांगितलें.

प्रताप घरीं आला. तो आपल्या लेखनखोलींत बसला होता. तो विचारमग्न होता. आज त्यानें दोन वर्षांनंतर पुन्हां आपली दैनंदिनी लिहायला घेतली. पूर्वी तो रोज ती लिहीत असे. गेल्या दोन वर्षांत त्यानें लिहिली नव्हती. त्याच्या जीवनांत क्रांति होत होती. दैनंदिनीचा काय उपयोग असें मनांत येऊन ती लिहिणें त्यानें बंद केलें होतें. जणूं पोरकटपणा असें त्याला वाटलें.

परंतु आज त्याला वाटलें कीं, दैनंदिनी लिहिणें म्हणजे पोरकटपणा नाहीं. स्वतःच्या अंतरात्म्याजवळचा तो संवाद असतो. इतके दिवस त्याचा आत्माच झोंपीं गेलेला होता. आतां त्याला जागृति आली होती. हें दिव्य आत्मतत्त्व प्रत्येकांत आहे. त्याच्याशीं बोलणें म्हणजेच दैनंदिनी.

'मी काल कोर्टांत गेलों. ज्यूरींत होतों म्हणून. आणि मी जागा झालों. जिला मींच भुलविलें, मोहदरींत पाडलें, ती तेथें कैदी-पोषाखांत गुन्हेगार म्हणून होती. माझ्याच निष्काळजीपणामुळें तिला काळ्या पाण्याची शिक्षा झाली. आज तिला भेटण्यासाठीं म्हणून मी गेलों. भेट मिळाली नाहीं. तिला मी भेटेन. हर प्रयत्नांनीं भेटेन. तिच्याजवळ सारें कबूल करीन. माझ्या कृतकर्मांचें प्रायश्चित्त तिच्याशीं लग्न लावूनहि मी घेईन. लग्न लावून पापाची निष्कृति होईल का? मी शक्य तें सारें करीन. प्रभु मला मार्ग दाखवो, हात धरून मला चालवो. आज मनांत शान्ति आहे, आनंद आहे. अंधार दूर झाला आहे.'



आणि रूपाची मनःस्थिति कशी होती? शिक्षा होऊन ती तुरुंगांत गेली. त्या रात्रीं तिला झोंप नाहीं आली. कोर्टांतील सारें दृश्य तिच्या डोळ्यांसमोर होतें. परंतु प्रतापला तिनें ओळखलें नव्हतें. तें पूर्वीचें निष्पाप बालपण, तें प्रेम, त्या मधुर मंगल स्मृती, त्या तिनें खोल पुरून टाकल्या होत्या. ती त्या गोष्टी कधींहि आठवीत नसे. त्या स्मृती अति दुखःकारक होत्या. ती त्या विसरून गेली. स्वप्नांतहि त्यांची आठवण तिला येत नसे. इतका जाड पडदा त्यांच्यावर तिनें टाकला होता. तो पहिल्या भेटींतील प्रताप—त्या वेळेस किती तरुण! त्या वेळेस त्याला मिशीहि फुटली नव्हती. आणि आज त्याला थोडें टक्कल पडलें होतें. मोठ्या मिशा होत्या. परतु त्याच्या चेहऱ्यांत असा फरक होता म्हणून तिनें त्याला ओळखलें नाहीं असें नव्हे. तिनें त्याची स्मृतिच पुसून टाकिली होती. विशेषतः त्या रात्रीच्या प्रसंगीं. कोणती रात्र? तो ज्या गांवीं रूपा होती, त्या गांवच्या स्टेशनवर उतरला होता. तो घरीं गेलाहि नाहीं. ती गरोदर होती. तिनें त्याला चिठ्ठी पाठविली. त्याचें उत्तर आलें कीं, 'मी येऊं शकणार नाहीं.' शेवटीं ती स्वतः रात्रीं



दोन वाजतां स्टेशनवर गेली. गाडीच्या वेळेवर तरी तो भेटेल म्हणून ती गेली. रात्रीं पाऊस होता. सोसाट्याचा वारा होता. ती अंधारांतून त्याला भेटण्यासाठीं स्टेशनवर गेली, तों स्टेशनवर गाडी आली होती. तो डब्यांत बसला होता. कोठल्या डब्यांत ती त्याला शोधणार? त्या स्टेशनांत गाडी फक्त तीन मिनिटें थांबे. ती धांवत होती. इकडे तिकडे बघत होती. डबा सांपडेना. आणि गाडी सुटायची घंटा झाली. तिला पहिल्या वर्गाच्या डब्याच्या खिडकीजवळ तो दिसला. त्या डब्यांत झगमगित प्रकाश होता.

दुसरे दोन अंमलदार तेथें बसलेले होते. ते पत्ते खेळत होते. प्रताप तेथें होता. तो हंसत होता. त्याच्या अंगावर गरम कपडे होते. बाहेरचा वारा-पाऊस आंत येऊं नये म्हणून खिडकी लावलेली होती. रूपा गारठून गेली होती. तिनें त्या खिडकीवर जोरानें मूठ मारली. परंतु शेवटची घंटा होऊन जरा मागें येऊन गाडी निघाली. पत्ते खेळणाऱ्यांपैकीं एकजण खिडकी-जवळ येऊन बाहेर पाहूं लागला. पुन्हां तिनें खिडकीजवळ तोंड नेलें. गाडीला वेग आला. ती पळत होती. तो खिडकी खालीं करूं पाहात होता. ती घट्ट बसली होती. गाडी अधिकच वेगांत आली. ती धांवत होती. शेवटीं फलाट संपण्याची वेळ आली. तीं खालीं पडली असती. परंतु सांवरली. ती रेल्वेच्या रस्त्यानें पळत होती. पहिल्या वर्गाचे डबे गेले. तरी ती पळत होती. आतां शेवटचा डबाहि गेला ! ती पुढें जात होती. गाडी निघून गेली. पाण्याची उंच टाकी आतां आली. वारा भयंकर होता. रूपाच्या अंगावरची शाल उडून गेली. तिला भान नव्हतें. अजून गाडी पकडूं, त्याच्याजवळ बोलूं असें जणूं तिला वाटत होतें. शेवटीं तिचे पाय थकले. ‘ गेला, गेला ’ ती अत्यंत दुःखानें म्हणाली. ‘ तो तेथें आंत मऊ गाद्यांवर प्रकाशांत खेळत-खिदळत आहे, आणि मी येथें अंधारांत, उघडी, निराधार रडत आहें. देवा, काय करूं ! गेला, तो गेला. ’ असें म्हणून ती तेथें बसली. ती ओक्साबोक्शीं रडूं लागली. अश्रू आंवरत ना. काय करील बिचारी ! येऊं दे एखादी गाडी नि माझा चेंदामेंदा करूं दे असें ती मनांत म्हणाली; परंतु पोटांत बाळ होतें. मरून प्रतापवर सूड उगवण्याचा तिचा विचार विरून गेला. त्या अजात बाळानें तिला त्या विचारापासून परावृत्त केलें. प्रतापविषयींची तिच्या मनांतील तीव्र कटुता नाहींशी झाली. ती उठली. तिनें आपली शाल घेतली. तिनें ती नीट अंगाभोंवतीं गुंडाळली. पोटांतील बाळाला ती जपत होती. अंधारांतून ती घरीं गेली.

त्या रात्रीपासून देवाधर्मावरचा, मानवावरचा, सत्यावरचा, न्यायावरचा, प्रेमावरचा सर्व मांगल्यावरचा तिचा विश्वास उडाला. पूर्वी ती श्रद्धावान् होती. देवांची पूजा करी, प्रार्थना करी. हितमंगलावर ती विश्वास ठेवी. आणि तिला वाटत असें कीं दुसरेहि असेंच विश्वास ठेवणारे असतील. परंतु त्या रात्रीचा तो कठोर अनुभव, वेदनादायी अनुभव आला नि तिची

श्रद्धा कायमची भंगली. देवधर्म म्हणजे केवळ शब्द आहेत. जगांत सारा दंभाचा पसारा आहे. सत्यावर खरें पाहिलें तर कोणाचाच विश्वास नसतो; असें तिला आतां वाटूं लागलें. ज्याच्यावर तिनें प्रेम केलें, त्यानें तिला भोगलें आणि कचऱ्याप्रमाणें फेंकून दिलें. हें प्रेम का वंचना ? आणि तिला माहीत असलेल्या तरुणांत प्रताप हा सर्वांत चांगला असें तिला वाटत होतें. तो चांगला जर ह्या प्रकारचा, तर इतरेजनांविषयीं बोलायलाच नको. त्या मावश्यांनीं तिला घालविलें. आपल्या भाच्याचें पाप त्या कशाला घरांत ठेवतील ? आणि रूपा जेथें जेथें गेली, तेथें तेथें तिला सर्वांनीं छळलें, लुटलें. पुरुषाची भोगी दृष्टि आणि स्त्रिया लुबाडीत. जो तो सुखासाठीं लालचावलेला. स्त्री असो पुरुष असो. सर्वत्र सुख नि भोग यांची दृष्टि. जो तो स्वतःपुरतें पाहाणारा. तो एक कवि तिला भेटला होता. तो म्हणे, 'अग, हे प्रेमभोग म्हणजेच परमानंद. जीवनाचें हेंच सारसर्वस्व ! हेंच खरें काव्य ! हेंच खरें सौंदर्य !' रूपाला कटु अनुभव आला कीं, जो तो स्वतः-साठीं जगतो, स्वतःच्या सुखासाठीं. देवधर्म—सारा दंभ, फापट पसारा. या जगांत सारे परस्परांस छळीत आहेत, गिळीत आहेत. म्हणून जगांत सर्वत्र दुःख आहे. कधीं कधीं तिला दुःख असह्य होई. आपण अधःपतित होत आहोंत याचें तिला वाईट वाटे. परंतु ती मग दारू पिई. मनांत संशय येऊं देत नसे. ती धूम्रपानहि करूं लागली. ती क्षणभर कोणावर प्रेम करी, त्याला प्रेमभोग देई, त्याला दूर करी ! सारें जग असेंच आहे ती म्हणे. अशा या जगांत धर्माचीं हीं सोंगें कशाला ? ज्या तुरुंगांत न्याय नाहीं, दया नाहीं, माणुसकी नाहीं, तेथें रविवारीं ते प्रवचनकार येतात ! सारा चावटपणा ! ते तुरुंगाचे अधिकारी येतां जातां लांच खातात नि गुन्हे-गारांना धर्म शिकवण्यासाठीं प्रवचनें ! गुन्हेगार खरें कोण ?

रात्रभर ती अशा विचारांत होती. सारें जीवन तिला आठवलें. पहांटे पहांटे तिचा डोळा लागला. दुसरा दिवस उजाडला. ती खिन्नच होती.

'कशाला रडतेस ? जा काळया पाण्यावर. तेथें प्रेम करायला कोणी तरी मिळेल. तुला आतां कोणीहि चालत असेल.' एक बाई म्हणाली.

'केव्हां येथून जावें लागेल ?' तिनें विचारलें.

'महिन्या दोन महिन्यांत.' कोणीं तरी उत्तर दिलें.

तो दिवसहि गेला. काळ्या पाण्याची ती वाट पाहात होती.

प्रतापला दुसऱ्या दिवशीं दहा वाजतां यायला सांगण्यांत आलें होतें. त्याप्रमाणें तो आला. भेटीला आलेल्या स्त्री-पुरुषांची तेथें गर्दी होती. तो आंत जाऊं पाहात होता. जेलरची त्याला थप्पड बसली.

'अंदर किदर जाता है?' असें म्हणून जेलर आंत गेला. प्रताप शरमला. त्याच्या डोक्यावर ती थप्पड बसली होती. तो जमीनदार होता. सरकारदरबारीं त्याची ओळख. थोरामोठ्यांशीं त्याच्या ओळखी. प्रतापनें मान खालीं घातली. तो मनांत म्हणाला, 'जसे हजारों इतर लोक तसाच मी; मी स्वतःसाठीं निराळ्या गोष्टींची कां इच्छा करावी? त्यांना पोलीस दरडावतात, थपडा देतात, तसाच मी. त्या जेलरनें मला ओळखलें नसावें. तोहि गर्दीत होता. परंतु मी कशाला मनाला लावून घेऊं? जसे इतर लोक तसाच मी.'

भेटीची वेळ झाली. तेथें गजांची खोली होती. आंतल्या बाजूस कैदी उभे राहात. बाहेर भेटीला आलेले. गजांतून भेट व्हायची. पति, पत्नी, भाऊ, बहिणी, आईबाप, मुलें एकमेकांस गजांतून पाहात होतीं. तीं तिकडे उभीं, हीं इकडे उभीं. सर्वांची एकदम बोलणीं सुरू झाली. हुंदके ऐकूं येऊं लागले. लहान मुलें रडूं लागलीं. पोलिसांचे दटावणीचे शब्द सुरूच होते. तेथें सारी निष्ठुरता होती. तेथें माणुसकी नव्हती. तेथें सारा गोंधळ होता. मानवी जीवनाचा केवढा उपमर्द तेथें होत होता! परंतु जेलर, पोलीस, कोणालाहि त्याचें वाईट वाटत नव्हतें. त्यांच्या मनांत त्याचा विचारच येत नसे.

'बायकांना कोठें भेटायचें?' त्यानें विचारलें.

'इकडे. कोणाला भेटायचें आहे? राजकीय बाई कीं गुन्हेगार कैदी बाई?'

'कैदी. शिक्षा झालेली गुन्हेगार स्त्री.'

रूपाला बोलावणें गेलें.

'कोण आलें मला भेटायला?' ती आश्चर्यानें म्हणाली.

वेश्यागारांतून कदाचित् कोणीं आलें असेल असें तिला वाटलें. तिकडे प्रताप उत्सुकतेनें वाट बघत होता. ती आल्यावर काय बोलायचें याचा

विचार तो करीत होता. आणि रूपा आली. गजांजवळ ती उभी राहिली. आणि तो या बाजूनें उभा होता. आजूबाजूला इतर भेटी चालल्या होत्या. त्यांच्यादेखत काय बोलणार ?

' कोण आलें आहे मला भेटायला ? तुम्ही का ? ' तिनें विचारलें.

' हो. मी...मी आलों आहें...रूपा, मी... '

ज्या गोष्टींची कधींहि ती आठवण होऊं देत नसे, त्या साऱ्या घों करून हृदयांत वर आल्या. तिच्या तोंडावरचें स्मित लोपलें. दुःखाची दारुण छटा, करुण छटा तिच्या तोंडावर पसरली.

' तुम्ही काय म्हणतां तें मला नीट ऐकूंहि येत नाहीं. ' भुंवया आकुंचित करीत, कपाळाला आठ्या पाडीत ती म्हणाली.

' रूपा मी आलों आहें.'

असें म्हणतांना त्याच्या डोळ्यांतून अश्रू आले. त्याचा कंठ दाटला. त्यानें मोठ्या प्रयासानें भावना आवरून अश्रू पुसले. तिनें त्याला ओळखलें.

' तुम्ही त्याच्यासारखे दिसतां...परंतु मला कांहीं आठवत नाहीं. ' ती त्याच्याकडे न बघतां म्हणाली.

तिचा चेहरा अधिकच खिन्न झाला.

' रूपा, तुझी क्षमा मागायला मी आलों आहें. ' एखादा पाठ केलेला धडा म्हणावा त्याप्रमाणें त्यानें तें वाक्य म्हटलें.

त्याला लाज वाटत होती. त्याचा चेहरा अति करुण दिसत होता.

तो पुन्हां म्हणाला,

' मीं तुझा मोठा अपराध केला आहे. मी गुन्हेगार आहें. क्षमा कर. '

त्याला अधिक बोलवेना. त्यानें तोंड वळवून अश्रू पुसले. तेथें एक अधिकारी होता. तो म्हणाला, ' तुम्ही रडतां काय ? तुम्ही दोघें बोला. वेळ संपेल. '

' या गजांतून बोलायचें कसें ? ' प्रतापनें विचारलें.

' तिला इकडे बाहेर आणूं का ? येथें बसून तुम्ही बोला. ' तो अधिकारी म्हणाला.

आणि रूपा बाहेर आली. जवळच प्रताप बसला. हिय्या करून तो म्हणाला;

‘ तुझ्याजवळ मी क्षमा मागतों. तूं क्षमा करणें कठिण हें मी जाणतों. परंतु गत गोष्टी कशा बदलतां येतील ? यापुढें जें जें माझ्या हातांत आहे तें तें मी करीन. ’

‘ तुम्ही मला कसें शोधून काढलेंत ? कसा मिळाला पत्ता ? मी येथें आहे कसें कळलें ? ’

‘ मी त्या ज्यूरींत होतों. तूं मला ओळखलें नाहींस ? ’

‘ नाहीं. ओळखायला वेळ कोठें होता. मी तुमच्याकडे पाहिलेंहि नाहीं. ’

‘ बाळ झालें होतें ना ? ’ त्यानें कांपऱ्या आवाजांत विचारलें.

‘ परंतु देवाच्या दयेनें तें लौकरच गेलें. ’ ती पटकन् म्हणाली.

‘ कां मेलें ? ’

‘ मीहि आजारीच होतें. मी मात्र दुर्दैवी वांचलें. ’

‘ माझ्या मावश्यांनीं तुला ठेवलें नाहीं ? ’

‘ जिच्या पोटांत बाळ आहे तिला कोण ठेवील ? त्यांच्या लक्षांत येतांच त्यांनीं मला घालविलें. परंतु आतां बोलून काय फायदा ? मला कांहीं आठवत नाहीं. तें सारें झालें गेलें संपलें. ’

‘ नाहीं, संपलें नाहीं. मी माझें पाप दूर करूं इच्छितों. ’

‘ परंतु आतां तें कसें दूर करणार ? तुम्ही कशाची भरपाई करणार ? जें झालें तें झालें. आतां तें परत कां येईल ? ’ असें बोलून दुःखानें तिनें त्याच्याकडे पाहिलें.

‘ तोच हा ’ अशी स्मृति होतांच तिच्या हृदयांत कोमल भावना उचंबळून आल्या होत्या. परंतु पुन्हां ती कठोर झाली त्या कोमल मधुर सुंदर भावना तिनें बळानें खालीं दाबल्या. तो पूर्वींचा नवतरुण तोच का हा ? तो प्रेमळ उदार तरुण तोच का हा ! नाहीं; याचा त्याचा कांहीं एक संबंध नाहीं असें तिनें मनांत ठरविलें. जरूर तेव्हां स्त्रियांना भोगणाऱ्या इतर पुरुषां-प्रमाणेंच हा एक. माझ्यासारख्या स्त्रियांनीं ज्यांचा उपयोग करून घ्यावा, असा हा एक; असें ती मनात म्हणाली. इतरांना भुलविण्यासाठीं, मोह पाडण्यासाठीं जशी ती हंसे, त्याप्रमाणें आतां ती त्याच्याकडे पाहून हंसली.

‘ तें सारें संपलें. मी आतां काळ्या पाण्यावर जाणार आहें. ’

‘ तूं निरपराधी आहेस. माझी खात्री आहे. ’

‘ मी अपराधी खरेंच नाहीं. मी का चोर, डाकू, विष देणारी, खुनी आहे ? अपील करण्यांत येईल तर मी सुटेन. परंतु तें खर्चाचें काम. ’

‘ मी एका बॅरिस्टराजवळ अपिलासंबंधीं बोललों आहें. ’

‘ करा अपील. पैशांकडे पाहूं नका. चांगला बॅरिस्टर द्या.’

‘ शक्य तें सारें मी करीन. ’

तिनें पुन्हां त्याच्याकडे पाहून तें वेश्यास्मित केलें.

‘ मला थोडे पैसे द्याल का ? पंचवीस रुपये पुरेत.’ ती हळूच म्हणाली.

‘ हो. देईन.’ असें म्हणून त्यानें खिशांत हात घातला. परंतु तेथें अधिकारी होता.

‘ त्याच्यादेखत नको. तो घेईल. तुम्ही हळूंच द्या.’

त्यानें त्या नोटा हातांत चुरगळल्या. तो मनांत म्हणाला, ‘ पूर्वींची निष्पाप रूपा मेली. ही सुधारणें कठिण आहे. कां बरें मीं हिचें लफडें लावून घ्यावें ? ती मला बुडवील. माझा इतरांसहि मग उपयोग होणार नाहीं. आज पैसे देऊन शेवटचा रामराम करावा.’ परंतु हे विचार त्याला आवडले नाहींत. त्यानें तें झडझडून दूर केले. हृदयांतील क्रांतिदेव निराळी भाषा बोलत होता.

‘ रूपा, मी तुझी क्षमा मागायला आलों आहें. तूं करशील ना क्षमा ? ’ त्यानें विचारलें.

परंतु तिचें लक्ष त्याच्या शब्दांकडे नसून त्याच्या हातांतील नोटांकडे होतें. अधिकाऱ्याची दृष्टि अन्यत्र वळतांच तिनें पटकन् त्याच्या हातांतून त्या घेतल्या.

‘ काय म्हणत होतां ? ’ तिनें हंसत तिरस्कारानें जणूं विचारलें. हिच्या हृदयांत आपल्याविषयीं वैरता आहे, तिरस्कार आहे, असें याला वाटलें. परंतु म्हणूनच आपण अधिक निश्चयानें तिच्या हृदयांत स्वतःविषयीं अनुकूलता निर्माण करण्याचा प्रयत्न केला पाहिजे असें त्यानें ठरविलें. तो अधिकच तिच्याकडे ओढला गेला. स्वतःविषयीं अनुकूलता तरी कशाला ? ती चांगली होवो. मीं निरपेक्षपणें निःस्वार्थ हेतूनें तिच्या कल्याणासाठीं खटपट केली पाहिजे. मला स्वतःला शून्य करूं दे.

‘ रूपा, तूं तिऱ्हाइतासारखें कां बोलतेस? मी तुला ओळखतों, स्मरतों. ते मागचे दिवस मला आठवतात. ’



‘ परंतु जें झालें गेलें तें आठवून काय फायदा? ’

‘ पुन्हां सारें नीट व्हावें, गोड व्हावें म्हणून. मी काय सांगूं?

‘ मला पूर्ण पश्चात्ताप झाला आहे. मी तुझ्याजवळ लग्नहि...’

परंतु हे त्याचे शब्द संपतात न संपतात तोंच तिच्या डोळयांत एक प्रकारची भीषण कठोरता त्याला दिसली. त्याला पुढें बोलवेना. तिच्या डोळ्यांत त्याला दूर लोटणारी वृत्ति होती; कांहीं तरी असत् भाव तेथें होता.

भेटीला आलेली मंडळी जाऊं लागली. वेळ संपली. तो अधिकारी येऊन म्हणाला, ‘ आटोपा. ’ प्रतापला पुष्कळ बोलायचें होतें. परंतु या वेळेस सारें बोलणें शक्य नव्हतें.

‘ मी पुन्हां येईन. सारें बोलेन.’ तो म्हणाला.

'आपण सारें बोललों. आतां काय बोलायचें राहिलें आहे ?'

त्याचा हात हातांत घेऊन ती म्हणाली. त्यानें तो हात दाबला नाहीं. तो पुन्हां म्हणाला, 'मी येईन. सारें बोलेन.'

'या पुन्हां.' ती म्हणाली.

'रूपा, बहिणीहून तूं अधिक वाटतेस.'

'तुम्हीं असें काय चमत्कारिक बोलतां ?'

शेवटीं ती गेली. प्रताप विचार करीत माघारा गेला. मी आपण होऊन तिची क्षमा मागायला, तिला मदत करायला आलों आहें असें पाहून ती विरघळेल अशी त्याची अपेक्षा होती. परंतु त्याला निराळाच अनुभव आला. रूपाला स्वतःच्या स्थितीचें वाईट वाटत नव्हतें. तिला कैदी म्हणून लाज वाटत नव्हती. एवढेंच नव्हे तर वेश्यापणाचीहि तिला लाज वाटत नव्हती. तिला वेश्यापणांत जणूं आनंद वाटत होता. त्या धंद्याचा जणूं तिला अभिमान वाटत होता. ज्याला त्याला आपला धंदा महत्त्वाचा वाटतो. नाहीं तर त्याच्या जीवनाला अर्थ काय ? आपणांस वाटतें कीं चोर, डाकू गुप्त पोलीस, वेश्या इत्यादींना स्वतःचा धंदा वाईट वाटत असेल; परंतु तसें नसतें. त्यांनाहि आपला धंदा महत्त्वाचा वाटत असतो. रूपालाहि तसेंच वाटे. सारे पुरुष, म्हातारे, तरुण, सुशिक्षित, अशिक्षित, विद्यार्थी, बडेबडे अंमलदार, सारे माझ्याकडे येतात. त्यांची इच्छातृप्ति करणें न करणें हें माझ्यावर अवलंबून आहे. माझा अनुभव हें सिद्ध करीत आहे, हे सारे लोक भोगासक्त असतात. आम्हां वेश्यांशिवाय त्यांना कोण आहे ? आमचेंहि महत्त्वाचें स्थान आहे. आम्ही कां लाजावें ? ज्या या जगांत सर्वत्र अत्याचार, वंचना, अन्याय सर्रास चालू आहेत, त्या जगांतल्याच आम्हीहि. आम्हीहि त्यांत शोभून दिसतों. रूपा जर ही दृष्टि सोडती तर तिला काय किंमत राहाती ? प्रतापराव तिला पुन्हां निराळ्या निर्मळ जगांत नेऊं पाहात होता, परंतु तिच्या लक्षांत तें येतांच तिनें कठोर मुद्रा धारण केली. त्याच्या विचारांविरुद्ध तिनें बंड पुकारलें. वर उसळून येणाऱ्या जुन्या स्मृती तिनें खालीं लोटल्या, दडपल्या. कारण त्या स्मृती आणि तिचें आजकालचें जीवन योंत "भेसूर विसंगति होती. तिची चर्या पाहातांच 'लग्न करीन' हे

शब्द तो उच्चारूं शकला नाहीं. ' मी पुन्हां बोलेन, सारे सांगेन, तूं बहिणीहून अधिक ' एवढेंच तो सूचक बोलला. त्याला स्पष्ट सांगवेना.

●●●

प्रताप त्या बॅरिस्टराकडे ठरल्याप्रमाणें गेला. साहेब कचेरींत होते. एक व्यापारी आला होता. कारकुनाजवळ तो बोलत होता.

' या प्रतापराव, बसा. त्या व्यापाऱ्याला जाऊं दे. अहो, दहा-वीस लाखांची तो असामी आहे. परंतु पैसाठीं मरेल. फीसाठीं घासाघीस करीत बसेल. सारखी बडबड चालू ठेवील. नमुने आहेत एकेक. जाऊं दे. ती तुमची केस मीं सारी अभ्यासून ठेवली आहे. '

इतक्यांत कारकून आंत आला.

' कांहीं कमी करतां येईल का फी ? '

' त्याला साफ सांगा कीं कांहींहि कमी होणार नाहीं. '

' तेवढी द्यायला तो तयार नाहीं. '

' जा म्हणावें. आम्ही का उगीच फी मागतों ? सारीं कायद्याचीं पुस्तकें उलथींपालथीं करावीं लागतात. रात्र रात्र जागरणें करावीं लागतात. मुद्दे काढावे लागतात. डोकें कसें सुन्न होतें. आम्ही रक्ताचें पाणी करतों. जाऊं दे. प्रतापराव, तुमची केस वाचली. अपिलास जागा नाहीं. मी उगीच खोटें कशाला सांगूं ? आपण शिक्षा रद्द व्हावी म्हणून प्रयत्न करूं. अर्ज कसा करायचा त्याचा मीं विचार केला आहे. सारे मुद्दे काढले आहेत. '

' अर्ज करून होईल का काम ? जेथें अर्ज करायचा तेथें कोण आहे मुख्य ? '

' बरोबर विचारलेंत. तेथें जो मुख्य असेल त्याच्यावर अवलंबून असणार सारें. '

' लौकरच कोणाला भेटायला हवें का ? '

' हो. म्हणावें अर्ज लौकरच विचारांत घ्या. नाहीं तर पुढें तीन महिने थांबावें लागेल. तेथेंहि काम झालें नाहीं तर राजाकडे दयेचा अर्ज करूं. '

' तुम्ही अर्ज वगैरे नीट लिहून ठेवा. तुमची फी ? '

' कारकून सांगतील. '



तो बाहेरच्या खोलींत आला. कारकुनानें शंभर रुपये सांगितले.

'शंभर?'

'हो.'

त्यानें खिशांतून नोट काढून दिली. आणि तो निघून आला.

प्रतापराव त्यानंतर एका बड्या अधिकाऱ्याला भेटला. रूपाला वाटेल तेव्हां स्वतंत्र खोलींत भेटण्याची त्यानें परवानगी मिळविली. एके दिवशीं सकाळीं तो पुन्हां रूपाला भेटायला आला. कचेरींत जेलर नव्हता. त्यानें चौकशी केली.

'बसा तुम्ही, साहेब महत्त्वाच्या कामांत आहेत. ते आले म्हणजे भेट देतील.' तेथील कारकून म्हणाला.

जेलरसाहेब कोणत्या महत्त्वाच्या कामांत होते? एका कैद्यानें अंधार-कोठडींत शिरण्याचें नाकारलें. माझा काय अपराध असें त्यानें विचारलें. इतरहि कैदी बंद होत ना. शेवटीं अधिक पोलीस आले. लाठीमार करून त्या सर्वांना बंद करण्यांत आलें. ज्या कैद्यानें प्रथम बंड पुकारलें त्याच्यावर तुरुंगांत फितुरी करण्याचा आरोप ठेवून फटक्यांची शिक्षा सुनावण्यांत आली. ते फटके आज सकाळीं देण्यांत यायचे होते. त्याला ओढून नेण्यांत आलें. तिकाटण्यास बांधण्यांत आलें. त्याला वेत मारण्यांत आले. साहेब त्या महत्त्वाच्या कामांत होते. ते आले ते हुश्श करीत आले.

'याद राहील चांगली.' कचेरींत येऊन तो म्हणाला. प्रतापनें नमस्कार केला.

‘ तुम्ही आलांत ? या बसा, तुम्हांला परवानगी मिळाली आहे. कोण आहे तिकडे ? त्या रूपाला आणा. म्हणावें भेट आहे. तुम्ही केव्हां आलांत ? अहो, आमच्यावर मोठी जबाबदारी असते, तुरुंग चालवणें कठिण.’

‘ तुम्ही थकल्यासारखे, त्रस्त झाल्यागत दिसतां ? ’

‘ ही नोकरीच नको असें वाटतें. आमचीं कर्तव्यें कठोर असतात. आम्ही या कैद्यांची स्थिति सुधारूं बघतों, परंतु हे अधिकच वाईट वागूं लागतात. काय करायचें ? कसें सुटायचें, मुक्त व्हायचें ? कळत नाहीं. ’

‘ तुम्ही नोकरी कां नाहीं सोडून देत ? ’

‘ कुटुंब आहे ना ? सर्वांना पोसूं कसें ? ’

‘ येथली नोकरी जर इतकी कठिण असेल तर ती सोडून दुसरीकडे बघा.’

‘ येथल्या नोकरींतहि थोडें समाधान आहे. हे कैदी तरी माणसेंच ना ? त्यांच्या उपयोगी पडतां येतें. माझ्या जागीं दुसरा असता तर यांचे हाल करता. मी किती जमवून घेतों, जपून वागतों. या कैद्यांची कींव येते, दया येते. हे कधीं कधीं आपसांत मारामारी करतात. परवां एकजण ठार झाला. ही पाहा आलीच रूपा. ’ रूपा आली. जवळच्या स्टुलावर ती बसली.

प्रतापनें अपिलाचा अर्ज आणला होता. शिक्षा कमी व्हावी म्हणून अर्ज जेलरच्या परवानगीनें त्यानें तिच्याजवळ तो सहीसाठीं दिला.

‘ सही करतां येते का ? लिहितां वाचतां येतें का ? ’ त्या जेलरनें तिला विचारलें.

‘ एके काळीं येत होतें. ’ ती म्हणाली.

तिनें सही करून तो अर्ज त्याच्याजवळ दिला.

‘ एक काम झालें. मला तुझ्याजवळ थोडें बोलायचें आहे.’

‘ बोला. ’

‘ या अर्जाचा कांहीं उपयोग नाहीं झाला तर शेवटीं राजाकडे दयेचा अर्ज करूं. ’

‘ तुमचा माझा संबंध आहे हें त्या दिवशीं ज्यूरींतील सर्वांना, तसेंच न्यायाधीशाला कळलें असतें तर त्यांनीं मला सोडलें असतें. ’

तिचें म्हणणें खरें होतें. परंतु त्याला त्या वेळेस तसें नीतिधैर्य झालें नाहीं. तिचे शब्द ऐकून त्याला वाईट वाटलें.

'तुम्हांला मी एक काम सांगतें. येथें तुरुंगांत एक बाई आहे. तिचा मुलगाहि. कांहींहि अपराध नसतां त्यांना अटक करण्यांत आली. तुम्ही तिच्या मुलाला भेटा. तो हकीगत सांगील. कांहीं करतां आलें तर करा.'

'मी खटपट करीन. रूपा, तुझ्याजवळ थोडें बोलायचें आहे.'

'मागें थोडें का बोललेत? आतां अजून काय बोलायचें शिल्लक आहे?'

'मी तुझी क्षमा मागतों.'

'आतां काय उपयोग क्षमा मागून?'

'केलेल्या पापाचें मी परिमार्जन करूं इच्छितों.'

'कशासाठीं?'

'कर्तव्य म्हणून. देवासाठीं.'

'कोणता देव आज तुम्हांला सांपडला, आज आठवला? माझा देव कधींच मेला आहे.'

'तुझा देव मेला?'

'हो मेला. तुम्हीच तो मारलात. आतां देव तुम्हांला आठवतो? शुद्धीवर आहांत का? देव, कोणता देव, शिल्लक उरला आहे? त्या वेळेस सारे देव मेले होते? आज त्यांचीं भुतें जागीं झालीं वाटतें?'

'शान्त राहा.'

'कां राहूं शान्त?'

'मी तुझी क्षमा मागत आहें.'

'माझी क्षमा? मी कोण? मी एक सामान्य कैदी आहें. मी एक वेश्या. तुम्ही प्रतिष्ठित, अब्रूदार जमीनदार; तुम्ही सद्गृहस्थ, तुम्ही माझ्याकडे नका येऊं. माझ्या स्पर्शानें मलिन नका होऊं. श्रीमंत बायकांकडे तुम्ही जा. माझी किंमत कागदाच्या चिटोऱ्याइतकी. माझी किंमत फार तर शंभर रुपये!'

'रूपा, तूं कितीहि निष्ठुरपणें बोललीस तरी माझ्या मनांतील भावना तूं बोलूं शकणार नाहींस. मी किती अपराधी म्हणून मला वाटत आहे त्याची तुला काय कल्पना?'

'अपराधी वाटतें आहे? त्या वेळेस वाटलें का? त्या वेळेस एक नोट अंगावर फेंकून चालते झालांत! जी माझी किंमत; तीच तुमचीहि किंमत!'

‘ होय. मी माझी किंमत अधिक नाहीं समजत. परंतु जें झालें तें थोडेंच परत येणार आहे ? आतां त्याचें काय ? मी तुला यापुढें न सोडायचें ठरविलें आहे. आणि मीं मनांत जें ठरविलें आहे तद्नुसार मी वागणार आहें. ’

‘ नाहीं, तुम्हांला तसें वागतां येणार नाहीं. ’

‘ रूपा ! ’

‘ चालते व्हा येथून. मी एक कैदी आहें, वेश्या आहें. तुम्ही जमीनदार प्रतिष्ठित बडे लोक. येथें तुमचें काय काम आहे ? कशाला मला पुन्हां पुन्हां बोलावतां ? ’

ती रागानें थरथरत होती. तिनें त्याच्या हातांतून आपला हात ओढून घेतला. ती पुन्हां म्हणाली,

‘ तुम्ही स्वतःचा उद्धार करूं पाहातां. माझ्यावर कृपा करून परलोकीच्या सुखाची सोय करून ठेवीत आहां. या जन्मीं मला भोगून, पश्चात्तापाचें आतां सोंग करून परलोकीं मोक्ष मिळावा म्हणून तुमची खटपट दिसते ! मोक्ष का इतका सोपा आहे ? इहपरलोकीं स्वतःच्या सुखापलीकडे तुम्हांला दुसरें कांहीं दिसतें का ? चालते व्हा. तुमचा मला तिटकारा आला आहे. तुमच्या लठ्ठ देहाचा तिरस्कार वाटतो. चालते व्हा.’

ती मोठ्यानें बोलत होती. जेलरनें तिच्याकडे पाहून, ‘ हा काय आहे आरडा ओरडा ? तूं कैदी आहेस विसरूं नकोस. असें मोठ्यानें नाहीं बोलतां कामा.’ असें फर्मावलें.

‘ रूपा, माझ्यावर तुझा विश्वास नाहीं का ? ’

‘ तुम्ही कां माझ्याशीं लग्न लावूं इच्छितां ? ’

‘ हो. ’

‘ नाहीं. ही गोष्ट कधींहि घडणार नाहीं. मी गळयाला फांस लावून मरेन. परंतु ही गोष्ट मी नाहीं होऊं देणार. समजलें ? ’

‘ तरीहि मी तुझी सेवा करीत जाईन; तुझ्या हितमंगलाची काळजी वाहीन. ’

‘ तें तुमचें तुम्ही बघा. मला तर तुमच्यापासून कशाचीहि अपेक्षा नाहीं. मला तुमचें कांहींहि नको. मी खरें तें साफ साफ सांगत आहें. खरेंच मीहि माझें बाळ मेलें त्याच वेळेस कां नाहीं मेलें ? ’ असें म्हणून ती रडूं लागली.

तिचे अश्रू पाहून त्याचेहि डोळे ओले झाले. तिनें अश्रूंतून त्याच्याकडे पाहिलें. जेलर म्हणाला, 'वेळ संपला.'

'रूपा, आज तूं अशान्त आहेस, प्रक्षुब्ध झाली आहेस. मी शक्य तर परत येईन; तूं पुन्हां विचार करून ठेव.' तो शेवटीं म्हणाला.

ती निघून गेली नि खोलींत खिन्नपणें बसून राहिली. सारें जीवन तिला आठवलें. परंतु त्या स्मृती तिला असह्य होत होत्या. प्रतापहि घरीं जात होता. आपल्या हातून केवढें पाप घडलें याची आज त्याला नीट कल्पना आली. या स्त्रीच्या आत्म्याची आपण काय स्थिति केली हें आज त्याला कळून आलें. आतांपर्यंत त्याची समजूत होती कीं, आपण कांहीं फार वाईट नाहीं. आपणांस पश्चात्ताप झाला आहे. आपण तिच्या उपयोगी पडत आहोंत. परंतु आज तो घाबरला. स्वतःच्या पापाचें स्वरूप पाहून त्याला अत्यंत वाईट वाटलें. हें पाप कसें निस्तरायचें हें त्याला समजेना. शेवटीं तो मनांत म्हणाला, 'तिचा मी त्याग करूं शकत नाहीं. शक्य तें सारें तिच्यासाठीं मी करीत राहीन.' तो जात होता. इतक्यांत जेलचा शिपाई धांवत येऊन म्हणाला, 'जेलरसाहेब तुम्हांला बोलावीत आहेत.' तो परत आला.

'काय आहे काम ?'

'अहो, त्या दिवशीं त्या रूपाला तुम्ही नोटा दिल्यात. झडतींत तिच्याजवळ सांपडल्या. असें कायद्याविरुद्ध कांहीं करीत नका जाऊं. हे पैसे मी तिच्या नांवावर ठेवतों. तिला जें सामान लागेल तें तिनें यांतून मागवावें. आणि एका राजकीय कैद्यानें तुम्हांला ही चिठ्ठी दिली आहे.'

तो जेलर गुप्त पोलिसाचेंहि काम करी. प्रतापचा राजकीय कटवाल्यांशीं संबंध आहे कीं काय हें त्याला पाहायचें असेल, राजकीय कैद्यांना वाटे कीं, जेलर आपलें काम करतो. परंतु जेलरचे हेतू निराळे होते. प्रतापनें तेथेंच ती चिठ्ठी वाचली. उगीच गुप्तता कशाला ?

ती राजकीय कैदी एक स्त्री होती. ती शाळाशिक्षक होती. पुष्कळ वर्षांपूर्वींची गोष्ट. प्रताप एकदां शिकारीस गेला होता. तो एका हॉटेलांत उतरला होता. तेथें ती त्याला प्रथम भेटली होती. ती त्याला तेव्हां म्हणाली, 'तुम्ही श्रीमंत लोक जुगार, शिकार, शर्यती यांत पैसे उधळतां गरिबांना शिकायला कां नाहीं मदत करीत ? मला कराल का कांहीं मदत ?

मी शिकेन, मी पुढें पैसे परत करीन?' आणि त्यानें तिला हवे होते तेवढे पैसे खिशांतून काढून दिले. तिनें त्याचे आभार मानले. तो म्हणाला, 'मीच तुमचे आभार मानायला हवेत. तुम्ही कर्तव्याचा पंथ दाखवलांत.' ते पैसे देतांना त्याला किती आनंद झाला होता! त्याला तो प्रसंग आठवला. त्या वेळचें शरीराचें, मनाचें निरोगी सामर्थ्य, त्या वेळचा उत्साह, उल्हास सारें त्याला आठवलें. ती स्त्री पुढें शाळेंत शिक्षक झाली. क्रान्तिकारकांशीं संबंध असल्याचा संशयावरून ती तुरुंगांत स्थानबद्ध होती. 'माझी भेट घ्या.' असें तिनें स्वतःची पूर्वीची ती ओळख देऊन विनविलें होतें.

'यांना भेटतां येईल का?' त्यानें विचारलें.

'राजकीय कैद्यांना नातलगच भेटूं शकतात. तुम्ही मोठ्या अधिकाऱ्यांची परवानगी आणा.'

'तसेंच एक माता नि तिचा मुलगा आग लावण्याच्या आरोपावरून येथें आहेत, त्यांना भेटायचें होतें.'

'पुढच्या वेळीं याल तेव्हां परवानगी देऊं. आज आतां उशीर झाला आहे.'

'ठीक. येतों. आभारी आहें.'

प्रतापराव निघून गेला. तो घरीं आला. आज तो बाहेर फारसा कोठें गेलाच नाहीं. फक्त सायंकाळीं एका बड्या अंमलदाराला भेटून त्या राजकीय स्थानबद्ध स्त्रीच्या भेटीची त्यानें परवानगी आणली. रूपाला आतां तो वाटेल तेव्हां भेटूं शकत असे.. त्या दिवशीं रात्रीं अनेक विचारांत तो मग्न होता. रूपाच्या अर्जाचें उत्तर येईपर्यंत तो मावश्यांच्या इस्टेटीकडे जाऊन येणार होता. ती जमीन शेतकऱ्यांना वांटून द्यावी असें त्याच्या मनांत येत होतें. तो स्वतः शेतकऱ्यांना भेटणार होता. त्यांच्याजवळ विचारविनिमय करणार होता. सारें देऊन तो अकिंचन होऊं इच्छीत होता. त्याला आनंद होत होता. माझा ध्येयवाद, माझें उदार जीवन, माझी न्यायबुद्धि, माझी सत्य-निष्ठा पुन्हां येत आहेत असें मनांत येऊन त्याला परम समाधान वाटत होतें.

रात्रीं शान्तपणें तो झोंपला. सकाळीं उठून थोडी न्याहारी करून तो जेलखान्यावर गेला. जेलरची व त्याची आतां चांगली ओळख झाली होती. हा कोणी तरी मोठा आहे असें शिपायांसहि आतां कळून चुकलें होतें.

'त्या म्हातारीला नि तिच्या मुलाला आधीं भेटून घेतों.' प्रताप म्हणाला.

'यांना घेऊन जा रे, बारा कोठ्यांत. तो आग लावणारा पोरगा आहे ना, त्याची यांना भेट घेऊं दे. हे पाहा प्रतापराव, पोरगा सारें सांगेल. म्हातारीला भेटण्याची काय जरूर ?'

'बरें तर.'

एका शिपायाबरोबर प्रताप बारा कोठ्यांत गेला. तो तरुण तेथें होता. त्यानें सारी हकीगत सांगितली :

'आमच्या गांवांत एक खानावळवाला आहे. त्याचा माझ्या बायकोवर डोळा. त्यानें तिला फूस लावून नेलें. मला कोठें न्याय मिळेना. तो खानावळ-वाला गांवच्या पाटलास, पोलिसांस लांच देई. माझी दाद लागेना. मी त्या खानावळवाल्याकडे जाऊन बायकोस आणलें. परंतु ती पुन्हां गेली. मी पुन्हां मागायला गेलों. तो म्हणाला, 'माझ्या घरांत ती नाहीं.' ती घरांत होती. मला नक्की माहीत होतें. 'माझी बायको टाक' असें म्हणून मी धरणें धरून बसलों. त्या खानावळवाल्यानें नि त्याच्या नोकरांनीं रक्तबंबाळ होईतों मला मारलें. दुसऱ्या दिवशीं त्या खानावळीस आग लागली. तिचा त्यानें माझ्यावर आळ घेतला. त्यानें घराचा विमा उतरून ठेवला होता. मी त्या खानावळवाल्यास एकदां देणार होतों तडाके, परंतु आग लावण्याचें स्वप्नांतहि माझ्या मनांत नव्हतें. आमच्यावर आरोप लादण्यांत आला. आई नि मी दोघांवरहि गुन्हा शाबीत करण्यांत आला. येथें आतां मरत पडलों आहोंत.'

'तूं खरेंच नाहीं आग लावलीस ?'

'नाहीं. देवासाक्ष नाहीं.' असें म्हणून त्या तरुणानें त्याच्या पायांवर डोकें ठेवलें. तो रडूं लागला. प्रतापनें त्याचे अश्रू पुसले नि सांगितलें; रडूं नकोस. मी शक्य तें सारें करीन.'

इतक्यांत त्याला दुसऱ्या कैद्यांनीं हांक मारली.

'महाराज, आमच्यावरहि दया करा. आम्हांला येथें उगीच अडकवून ठेवण्यांत आलें आहे. आम्हांला बेकार म्हणून पकडण्यांत आलें. आम्ही उत्तर हिंदुस्थानांतून आलों. अजून धंदा मिळाला नव्हता. तर येथें आणून ठेवलें. आमच्या मुलखांतल्या तुरुंगांत तरी पाठवा म्हटलें तर तिकडचे तुरुंग

भरलेले आहेत, इकडेच ठेवा असें म्हणे लिहून आलें आहे. येथें सडत पडलों आहोंत. सरकारनें उद्योग द्यावा. बेकार का कोणी आपण होऊन राहातो ?’

‘ पुरे करा रे तुमची कटकट. ’ पोलीस म्हणाला.

‘ आम्ही काय चोरीमारी केली आहे ? म्हणे पुरे करा. काय म्हणून गप्प बसूं ? ’

प्रतापनें त्यांना आश्वासन दिलें. तो परत फिरला.

‘ रावसाहेब, हे लोक सारेच चांगले नसतात. कांहीं बंडखोर असतात. तुरुंगांत फितुरी करतात. परवां शेवटीं शिक्षा करावी लागली दोघांना फटक्यांची. ’

‘ फटाक्यांची शिक्षा रद्द ना आहे ? ’

‘ तुरुंगांत फितुरी करणाऱ्यांना आहे. ’

प्रताप पुन्हां कचेरींत आला तेथें आणखी कांहीं मंडळी आली होती. कोण होती ती ? तेथें एक दोन-तीन वर्षांचा मुलगा होता. तो तेजस्वी होता. तो मुलगा प्रतापकडे आला नि म्हणाला,

‘ तुम्ही कोणासाठीं आलांत ? ’

‘ एका बाईला भेटायला. ’

‘ ती का तुमची बहीण आहे ? तुमची आई आहे ? ’

‘ नाहीं हो बाळ. तूं कोणाचा ? ’

‘ माझी आई आहे येथें तुरुंगांत. ती राजबंदी आहे. मी तिचा मुलगा.’

तो मुलगा जिच्याबरोबर आला होता तिनें त्याला जवळ घेतलें.

‘ काय विचारीत होता तो तुम्हांला ? एवढासा आहे परंतु साऱ्या त्याला उठाठेवी. तो तुरुंगांतच जन्मला. तो आईबरोबर पुढें काळ्या पाण्यावर जाणार आहे. ’

‘ येथें असल्या गोष्टी बोलायच्या नाहींत. ’ अधिकारी म्हणाला.

‘ बरें बरें. ’ असें म्हणून त्या बाळाला घेऊन ती तरुणी बाजूला जाऊन बसली.

प्रतापला आज त्या राजकीय स्त्रीसहि भेटायचें होतें. तिला भेटून मगच तो रूपाला भेटणार होता. ती राजकीय स्त्री आली. तिचे डोळे प्रेमळ, शान्त होते. तिच्या तोंडावर ध्येयार्थी हास्य होतें.

‘ तुम्ही आलांत बरें झालें. मी आभारी आहें. ’

‘ तुम्ही या तुरुंगांत असाल मला कल्पनाहि नाहीं. ’

‘ मी सुखी आहें, आनंदी आहें. मला आमच्या पक्षाच्या कामाशिवाय दुसरें कांहीं नको आहे. मी शाळाशिक्षिकेची जागा सोडून पुढें सेविका झालें. क्रांतिकारकांशीं माझा संबंध असे. शेवटीं मला अटक झाली. माझ्याबरोबर एका मुलीसहि अटक झाली. ती आमच्या पक्षाचीहि नव्हती. तेव्हां तरी नव्हती. तिला एका किल्ल्यांत बहुधा नगरच्या, स्थानबद्ध करून ठेवण्यांत आलें आहे असें कळतें. तिच्याजवळ कांहीं आक्षेपार्ह पत्रें, पुस्तकें सांपडलीं माझ्यामुळें तिला अटक. मीं ते कागद, तीं पुस्तकें तिच्याजवळ ठेवलीं. तिला काय माहीत कीं तें सारें आक्षेपार्ह वाङ्मय आहे म्हणून. तुम्ही तिच्या सुटकेची खटपट करा. दुसरी गोष्ट म्हणजे एक तरुणहि त्याच किल्ल्यांत डांबून ठेवलेला आहे. त्याची आई त्याला भेटायला अधीर आहे. परवानगी मिळत नाहीं. तुम्ही या मायलेकरांची भेट करवा. तसेंच त्या तरुणास कांहीं शास्त्रीय ग्रंथ पाहिजे आहेत. तो शास्त्रांचा विद्यार्थी होता. विज्ञानाची त्याला फार आवड. त्याला येथें ‘ गीता ’, ‘ मनाचे श्लोक ’ देतात; परंतु शास्त्रीय पुस्तकें त्याला देत नाहींत; तरी तीं पुस्तकें त्याला मिळतील असें करा. यासाठीं तुमची भेट हवी होती. मला व्यक्तिशः कांहीं नको, मी सुखी आहें. ध्येयासाठीं जगणें, ध्येयासाठीं मरणें याहून अधिक धन्यतेचें दुसरें काय आहे ? खरें ना ? आमची क्रान्ति कधीं यशस्वी होईल ? जनता सुखी केव्हां होईल ? सारा अन्याय कधीं संपेल ? याचीच एक चिंता आम्हांला असते. अच्छा, वंदे मातरम् ! ’

‘ तुम्ही येथेंच राहाल का ? ’

‘ कोणास माहीत ? हद्दपारहि करतील, काळ्या पाण्यावर पाठवितील कांहींहि होवो. आनंद आहे. ’

‘ आणि तो मुलगा जिचा, ती कोण ? ’

‘ ती एका लष्करी अधिकाऱ्याची मुलगी आहे. या तुरुंगांतच ती आहे. तिचें एका क्रान्तिकारकावर प्रेम बसलें. त्यांचा एक गुप्त छापखाना होता. एके रात्रीं पोलिसांची धाड आली. छापखाना चालू होता. एकदम दिवे मालवण्यांत येऊन तेथून कागदपत्र नेण्यांत येऊं लागले. पोलीस आंत घुसले.

त्यांच्याजवळ प्रकाशिका होत्या. तिनें मुख्य अंमलदारावर गोळी झाडली असा तिच्यावर आरोप. गोळी तिनें झाडली नव्हती. तिनें पिस्तूल कधीं हातांत धरलें नव्हतें. परंतु प्रियकरावरचा आरोप तिनें स्वतःवर घेतला. 'मीच गोळी झाडली' असें तिनें सांगितलें. तिला जन्मठेप काळ्या पाण्याची शिक्षा झाली आहे."

'थोर त्यागी मुलगी.' तो म्हणाला.

'त्या मुलाला घेऊन ती काळ्या पाण्यावर जाणार आहे. पाहा कसा तेजस्वी बाळ आहे! तो मोठा होईल तेव्हां तरी देश स्वतंत्र झालेला असो.'

'रूपा आली आहे. तुमची मुलाखत आटपा.' अधिकारी म्हणाला.

त्या क्रान्तिकारक स्त्रीनें रूपाविषयीं ऐकलें होतें. त्यानें तिला थोडी हकीगत सांगितली.

'तिला दवाखान्यांत काम द्यायला सांगा. किंवा राजकीय स्त्री कैद्यांत ठेवा अशी प्रार्थना करा, म्हणजे वाईट संगतीपासून दूर राहील. ती सुधारले.' तिनें जातां जातां त्याला बाजूला बोलावून सूचना केली.

'आभारी आहें तुमच्या सूचनेबद्दल.' तो म्हणाला.

रूपा आणि तो थोडाच वेळ आज बोललीं. तिच्या मनांतून अढी गेलेली नव्हती.

'तूं दवाखान्यांत काम करशील?' त्यानें विचारलें.

'करीन. वेळहि बरा जाईल. दुसऱ्यांची सेवा करतां येईल.'

'आणि गुन्हेगार बायांपासून दूर असशील. मी जेलरसाहेबांस सांगेन, त्यांना विनंति करीन.'

'माझी शिक्षा कमी नाहीं झाली तर?'

'तुला काळ्या पाण्यावर पाठवतील. मी तुझ्याबरोबर येईन.'

'नको. माझ्यासाठीं तुम्हांला त्रास नको.'

तो कांहीं बोलला नाहीं. थोड्या वेळानें तो निघून गेला. जातांना एक करुण दृश्य त्यानें पाहिलें. त्या क्रान्तिकारक तरुणीची आई, तिचे भाऊ सारे भेटायला आले होते. ती मुलासह दुसऱ्या दिवशीं काळ्या पाण्यावर जायची होती. आजीनें नातवाचा मुका घेतला. त्या तरुणीचे म्हातारे आजोबाहि आले होते. ते दुःखानें तिचा हात धरून उभे होते.

'आजोबा, वाईट नका वाटून घेऊं. मी सुटून येईपर्यंत तुम्ही नसाल. लौकर क्रान्ति झाली नि मी जिवंत असलें तर भेटूं. हा बाळ तेथें विरंगुळा आहे. मला वाटलें होतें कीं त्यांनाहि तेथेंच पाठवतील. परंतु त्यांना दुसऱ्या परप्रांतीय तुरुंगांत ठेवण्यांत आलें आहे. आई तुम्ही त्यांची भेट घेतां आली तर घ्या. सर्वांना सांभाळणारा तो प्रभु.'

आईनें मुलीला पोटाशीं धरलें. आजोबांनीं नातवाचा मुका घेतला. भावांचे डोळे अश्रूंनीं भरून आले होते. सर्वांपासून तिची ताटातूट होणार होती.

'आटपा, आटपा.' जेलर म्हणत होता.

तें करुणगंभीर दृश्य पाहून प्रताप विरघळला. क्रान्तिकारकांविषयीं त्याचें अनुकूल मत नव्हतें. तो त्यांना दहशतवादी म्हणे. बॉंब वगैरे प्रकार त्याला पसंत नसत. परंतु त्यांचा त्याग, त्यांची धीरोदात्तता, हीं प्रियजन-वियोगदु:खें हें पाहून त्याला निराळें वाटूं लागलें. विचार करीत तो घरीं गेला.

●●●



## ३

रूपा जर काळ्या पाण्यावर गेली तर प्रतापहि जाणार होता. तो आपली सारी जमीन शेतकऱ्यांना वांटून देऊं इच्छीत होता. परंतु त्याच्या मनांत नक्की कांहीं ठरेना. माणसें नदीप्रमाणें असतात. तीं कधीं दयाळु असतात, तर कधीं क्रूर बनतात; कधीं कष्टाळु असतात तर कधीं सुखविलासी बनतात; कधीं आसक्त तर कधीं विरक्त; कधीं शहाणपणा दाखवतात, तर कधीं कमालीचा मूर्खपणा करतात. अशा विरोधांतून माणूस विकासाकडे जात आहे. प्रतापचें असेंच आजपर्यंत होतें. आतां कोठें स्थिर असें वळण त्याच्या जीवनाला लागत होतें. तरीहि अधूनमधून अनिश्चितता डोकावे. एकदां सारी जमीन देऊन टाकावी असें त्याला वाटे. तर पुन्हा वाटे जर आपण रूपाशीं लग्न लावलें तर घरदार, जमीनजुमला नको का ?

त्यानें आपल्या जमीनदारीवर जाण्याचें ठरविलें. प्रथम तो आईची जी इस्टेट होती, ती पाहायला गेला. तेथें त्याचे दिवाणजी होते. त्यांच्याशीं त्यानें चर्चा केली.

' सारी शेती यंत्रें लावून घरींच करा. शेतकऱ्यांना कमी खंडानें दिलीत तरीहि ते शेती बिघडवतील, जमीन बिघडवतील. तुम्ही सारी शेती खंडानें

दिलीत तर या सर्व अवजारांचें काय करायचें? हे वाफेचे नांगर आहेत इतर यंत्रें आहेत. गाई-गुरें, बैल सारें का विकून टाकायचें? त्यांची किंमत नीट येणार नाहीं. मातीमोलानें हें सारें विकावें लागेल. तुम्ही माझें ऐका; सारी शेती यांत्रिक करून टाका. भरपूर फायदा होईल. तुम्हांला अनुभव आलाच आहे. जी कांहीं जमीन आपण घरीं करतों, ती कशी किफायतशीर पडते. खरें ना?'

'माझी इच्छा खंडानें देण्याची आहे.' प्रताप म्हणाला.

'धन्याच्या इच्छेविरुद्ध मी नाहीं. आज मीं कुळांना बोलावलें आहे. तीं येतीलच आतां.'

थोड्या वेळानें कुळें आलीं. तेथें बाजूला बसलीं.

'तुम्ही यायला उशीर केलांत. या मालकांना बसावें लागलें. धनीसाहेबांची इच्छा आहे कीं तुम्हांला सारी जमीन खंडानें द्यावी.'

'द्या. भरपूर जमीन द्या. यांची आई चांगली होती. हेहि तसेच असतील. आम्हांला दूर लोटूं नका. सारी जमीन तुम्हीच घरीं करूं लागलांत तर आम्ही काय खावें? येथून उठून का शहरांत जाऊं? तेथें तरी कोठें काम आहे? तेथेंहि बेकार आहेत.'

'तुमच्या कांहीं तक्रारी आहेत?' प्रतापनें विचारलें.

'एकच तक्रार कीं भरपूर जमीन मिळत नाहीं. ती तक्रार दूर करा.'

'त्यासाठीं तर मी येथें आलों आहें. सारी जमीन मी तुम्हांला देऊं इच्छितों.'

'परंतु खंड काय घेणार? खंडापायीं मेटाकुटीस येतो जीव.'

'अगदीं कमी खंडानें मी तुम्हांला देणार आहे. आज जो खंड आहे, त्याच्या निम्म्यानें तुम्ही द्याल?'

'मोठ्या खुशीनें. आमच्यावर उपकार होतील. खंड परवडेल असा असला म्हणजे तुम्हांला त्रास नाहीं, आम्हांला त्रास नाहीं.'

'त्रास सध्यां आम्हांलाच आहे. तुम्हांला कसला आहे त्रास? खुशाल तुम्ही गुरेंढोरें सोडतां, धन्याचीं शेतें खाऊं देतां! थोडीफार घरीं केलेली जमीनहि तुम्हांला पाहावत नाहीं. त्या दिवशीं या गोविंदाचे बैल आमच्या मळ्यांत. चरत होते.' दिवाणजी रागानें बोलले.

‘ मालक, बैल का मुद्दाम घातले मळ्यांत ? मी माझ्या शेतांत बैल चारीत होतों. माझा जरा डोळा लागला. बैल गेले. यांनीं लगेच कोंडवाड्यांत घातले. काय करावें आम्ही गरिबांनीं ? ’

‘ तूं आपल्या शेताला कुंपण घाल. म्हणजे बैल बाहेर जाणार नाहींत. ’ दिवाणजी म्हणाले.

‘ कशानें कुंपण घालूं ? तुमच्यासारख्या कांटेरी तारा आम्ही थोड्याच आणूं शकतों. चार डांभे तोडले तर तुम्ही खटले भरतां. मागें जंगलांतून चार फांटीं आणलीं तर त्यांनीं मला तुरुंगांत घातलें. काडीकाडीवर तुम्हां जमीनदारांची, खोतांची सत्ता. कोठें चारावीं गुरें ? कोठून आणावें जळण ? कोठून आणावें थोडें लांकूड ? मालक, आमचे हाल तुम्हांला काय ठाऊक ? ’

‘ धनी, याच्या चोराच्या उलट्या बोंबा आहेत. दरसाल हा चोरून लांकूड लांबवतो. ’

‘ बाबा रे, तूं म्हणशील तें खरें. आम्ही कोण ? ’ एक म्हातारा शेतकरी म्हणाला.

‘ आम्हांला न्याय या जगांत मिळणार नाहीं. मागें या दिवाणजींनीं मला मारहाण केली. मीं फिर्याद केली. परंतु कांहीं चाललें नाहीं. श्रीमंतांविरुद्ध फिर्याद करण्यांत अर्थ नसतो. ’

‘ मला जायचें आहे. तुम्हांला भरपूर जमीन द्यायला मी सांगेन. सध्यां खंड देतां त्याच्या निम्मे खंड ठरवूं आज तुम्ही जा. तुम्हांला सुखाचे दिवस येतील असें मी करीन. दया म्हणून नव्हे. तुमचा न्याय्य हक्कच आहे. तुम्ही खपतां. तुमचाच वास्तविक या जमिनींवर हक्क. असो. ’

‘ देव तुम्हांला अशीच बुद्धि देवो. ’ ते शेतकरी म्हणाले.

प्रतापराव तेथें फार राहिला नाहीं. तो आपल्या मावश्यांच्या इस्टेटीकडे जायला निघाला. त्यानें पत्र पाठवून ठेवलेंच होतें. मावश्यांच्या त्या मोठ्या घरांत आतां कोणी राहात नसे. तेथेंहि दिवाणजी होता. त्याला कांहीं जागा राहायला देण्यांत आली होती. मालक येणार म्हणून वाडा झाडून पुसून साफ करण्यांत आला होता. गडीमाणसें कामांत होतीं. एक आचारी स्वयंपाकपाण्यासाठीं मुद्दाम लावला होता. आणि मालक आला. दिवाणजी स्टेशनवर घोड्याची गाडी घेऊन गेले होते. प्रतापराव घरीं आला. तो आपल्या खोलींत गेला.



त्याला रूपाच्या शतस्मृती आल्या. तो बाहेर पडला. जेथें तिच्याजवळ तो प्रथम बोलला होता, त्या जागेवर तो उभा राहिला. तेथें आंब्याचें झाड होतें. त्याची दाट छाया तेथें आजहि होती. परंतु रूपा कोठें आहे? तो हिंडत होता. आणि ज्या ठिकाणीं रूपासह तो खेळला होता. तेथें तो गेला. तें कांटेरी झुडूप आतां तेथें नव्हतें. तो खळगा तेथें नव्हता. तुला लागलें का म्हणून रूपानें त्याला तेथें विचारलें होतें. त्यानें तिचे हात हातांत घेतले होते. तो तेथून नदीकडे गेला. नदी खळखळ वाहात होती. तो तेथें बसला. त्याला स्वतःचा जीवनप्रवाह दिसू लागला. प्रथम तो या गांवीं कित्येक वर्षांपूर्वी जेव्हां आला होता, तेव्हां तो निर्मळ होता, विशुद्ध होता; ध्येयार्थी होता, चारित्र्यवान होता; त्याचें जीवन त्या वेळेस नुकत्याच

उमलणाऱ्या फुलाप्रमाणें घवघवीत, टवटवीत ताजें ताजें होतें. आणि आज? ज्या विशाल जीवनाला मिठी मारण्याचें त्याचें ध्येयस्वप्न होतें, तें कोठें आहे? परंतु तो पुन्हां ध्येयाचा यात्रेकरू होत होता. आडरानांतून पुनरपि संतांच्या मार्गावर येत होता. तो उठला. तो घरीं आला. जड अंतःकरणानें तो घरीं आला. त्यानें स्नान केलें; भोजन केलें; तो जरा पडला. त्या घरांत तो हिंडत होता. मावश्यांचीं कपाटें तपाशीत होता. एके ठिकाणीं त्याला जुनीं पत्रें सांपडलीं आणि एक मोलाची वस्तु त्याला सांपडली. रूपाचा त्या वेळचा एक सुंदर फोटो त्याला आढळला. किती सुंदर ती दिसत होती! साधेपणा, तजेलदारपणा, एक प्रकारची निर्मळ मोहकता तिच्या चेहऱ्यावर दिसून येत होती. त्यानें तो फोटो खिशांत घातला. तो आतां थकला होता. त्यानें जरा वामकुक्षी केली. परंतु फार वेळ त्याला झोंप लागली नाहीं. कशी येणार झोंप? तो उठला. दिवाणजींनीं चहा आणला.

'बसा दिवाणजी.' तो म्हणाला.

'आपली व्यवस्था सारी ठीक आहेना?'

'सारें ठीक आहे. येथें या गांवात रूपाची मावशी राहाते का हो? तुम्हांला माहीत आहे?'

'हो. या गांवांतच ती राहाते. चोरून ताडी विकते. तिची मी चांगली खरडपट्टी काढणार आहें. मी तिच्यावर खटलाच भरणार होतों. परंतु म्हातारीची कींव येते. घरांत तिचीं नातवंडें आहेत.'

'कोठेसें आहे तिचें घर?'

'गांवाच्या टोंकाला. शेवटकडून तिसरें घर. विटांच्या एका घरापलीकडे तिचें घर आहे घर. कसचें, खोपट आहे. मीच येतों तुमच्याबरोबर.'

'नको नको. मी तें शोधून काढीन. तुम्ही उद्यां साऱ्या कुळांना बोलवा.'

तो एकटाच निघाला. त्याला शेतकऱ्यांची स्थितिहि स्वतःच्या डोळ्यांनीं पाहायची होती. ती पाहा एक मुलगी. पोटाशीं कोंबडें धरून जात आहे. तिनें ओळखलें कीं हेच ते जमीनदार. नवीन मालक. तिनें त्याला नमस्कार केला. ती पटकन् पळून गेली. त्याला गंमत वाटली. आपली यांना भीति वाटते असें मनांत येऊन त्याला जरा विषाद वाटला. आपल्या या झकपक पोषाखामुळें हीं गरीब माणसें जवळ येत नसावींत असें त्याला वाटलें. ती

एक अशक्त बाई दोन हातांत दोन बालद्या घेऊन येत होती. वाटेंत तिनें त्या टेकल्या. तिनें धन्याला नमस्कार केला. तो आतां गांवांत शिरला. जिकडे तिकडे शेणाचा, मुताचा वास येत होता. ठायीं ठायीं खतांचे ढीग होते. शेतकरी कामावरून परत येत होते. पुष्कळ अनवाणीच होते. त्यांचे कपडे शेणा-मातीनें मळलेले होते. रेशमी कपडे घातलेला हा कोण साहेब? असें त्यांना वाटलें. अजूनहि कोणी खतानें भरलेल्या गाड्या शेताकडे नेत होते. घरांतून, झोंपड्यांतून बायका बाहेर येऊन पाहात होत्या. एका माणसानें धीर करून पुढें येऊन विचारलें,

'त्या बायांचे आपण भाचे ना?'

'होय. कसें काय तुमचें चाललें आहे?'

'आमची फार दुर्दशा आहे. कशाला विचारतां?'

आमची स्थिति पाहायला आलांत वाटतें?' दुसऱ्या एकानें विचारलें.

'बघायचें काय धनी? माझ्या या घरांत लहानमोठीं बारा माणसें आहेत. दर महिन्याला दीड-दोन मण धान्य विकत घ्यावें लागतें. कोठून आणायचा पैसा?'

प्रतापनें त्या घरांत पाहिलें. फाटक्या चिंध्या अंगावर असलेलीं मुलें, बायामाणसें त्यानें पाहिलीं. त्यांच्या डोळ्यांत तेज नव्हतें. त्यानें विचारलें,

'पुरेसें धान्य तुम्ही कां नाहीं पिकवीत?'

'अधिक जमीन करायला मिळतें कोठें? तिघांना धान्य पुरेल इतकीच जमीन मला मिळाली आहे.'

'मग कसा चालवतां संसार?'

'कर्ज काढतों. एक जण शहरांत गेला आहे; चाकरी–धंदा, कांहीं रोजगार मिळाला तर करायला.'

'तुम्ही खंड किती भरतां?'

'एकावन्न रुपये रोख ठरला आहे. परंतु भाव नाहीं. खंड कमी नको होता का करायला?'

असें म्हणून तो शेतकरी घरांत गेला. तो बायकोला म्हणाला, 'धनी आले आहेत. कांबळ घाल बसायला.' त्याच्या बायकोनें घोंगडी घातली. तो बसला. त्या शेतकऱ्याची म्हातारी आई बाहेर आली.

‘ बरें आहांत धनी ? ’ म्हातारबाईनें विचारलें.

‘ होय आजी. तुमची स्थिति बघायला आलों आहें. ’

‘ कसें तरी जगतों. हें घर, ही खोपटीसुद्धां कोसळायच्या बेतांत आली आहे. एक दिवस आम्ही तिच्या खालींच गाडलीं जाऊं. परंतु हा म्हणतो कीं जातील अजून चार महिने. राहिलों आहोंत राजाप्रमाणें. कधीं चटणी-भाकर, कधीं भाकर–चटणी गंमत आहे गरिबांची. धनी, काय सांगावी आमची दशा. न बोलणें बरें ! ’

‘ मला द्या थोडी चटणी-भाकर. ’

त्यानें थोडी चटणी-भाकर खाल्ली.

‘ साधी कोरडी भाकर. चटणीहि मसालेदार नाहीं धनी. ’

येथें अंगणांत आतां बरींच लहानमोठीं माणसें जमलीं. प्रताप उठला.

‘ बसा हां. येतों मी. ’

‘ मेहेरबानी झाली. तुमचे पाय घराला लागले. ’

प्रताप पुढें चालला दोन मुलें पळत पळत त्याच्या पाठोपाठ आलीं.

‘ तुम्हांला कोठें जायचें ? ’

‘ गांवाच्या टोंकाला. ती म्हातारी राहाते ना तिच्याकडे. ’

‘ ती चोरून ताडी विकणारी ? ती हडळ ? ’

मुलांबरोबर जाण्यांत त्याला आनंद होत होता. मुलांच्या संगतींत मोकळेपणा असतो. तींहि खरें तें सांगत असतात. गांवाची नाडी कळायला हवी असेल तर गांवांतील मुलांना सारें विचारा.

‘ काय रे, तुमच्या गांवांत अगदीं गरीब अशीं कोण आहेत ? ’

‘ तो धोंडू, आणि गोप्या; तसेंच तो लखू, ती भागीहि फार गरीब आहे. ’

‘ भागीपेक्षां ती म्हातारी विठी गरीब आहे. ती भीक मागते. अंगावर चिंधी. ’

बोलत जातां जातां रूपाच्या मावशीचें घर आलें. तो आंत गेला. तीं मुलें बाहेरच रस्त्यांत उभीं होतीं.

‘ कोण पाहिजे तुम्हांला ? ’ म्हातारीनें बाहेर येऊन विचारलें.

'तुमच्याजवळ थोडें बोलायचें आहे. मी तुमचा मालक. त्या मावश्यांचा भाचा.'

'तो का तूं? माझ्या राजा, मी ओळखलेंच नाहीं हो! क्षमा करा दादा. तुम्ही मोठीं माणसें. पूर्वी तुम्ही फुलासारखे दिसायचे. आतां बरेच मोठे झालेत. मीं तुम्हांला मावश्यांच्या घरीं पाहिलें आहे. आज तुमचा चेहरा काळवंडलेला दिसतो. चिंता आहे. काळजी आहे वाटतें जिवाला? जगांत कुठेंहि जा. सगळीकडे कटकटी आहेत.'

'आजीबाई, तुम्हांला रूपा आठवते का?'

'आठवते म्हणून काय विचारतोस? ती माझी भाची. तिच्यासाठीं मी रडतें आहें. तिची आठवण कशी जाईल? तिच्या आईच्या मागें मींच तिला प्रेम दिलें आहे.'

'ती माझ्या मावश्यांकडे असे.'

'हो, मला सारें माहीत आहे. जाऊं दे कोणाची चूक नाहीं. कोणाचें पाप नाहीं. आपलेपणांत माणसें आलीं, वयांत आलीं, म्हणजे असें होतें. जवानी असते. सैतानाला फावतें. खरें ना? तुम्ही तिला लाथहि मारूं शकले असते! परंतु तुम्ही शंभर रुपये तिला दिलेत. आणि ती? वेडी हो ती. माझें ऐकती तर नीट राहाती. मीं तिला चांगला धनी मिळवून देत होतें. परंतु तिनें ऐकलें नाहीं. वेडी पोर. आमच्यासारख्यांनीं का थोरांमोठ्यांना धनीमाणसांना नांवें ठेवावीं? त्या मावश्यांनीं तिला हांकलून दिलें. पुढें जंगलच्या रेंजरकडे होती. तेथेंहि टिकली नाहीं.'

'तिला मूल झालें होतें. तें कसें होतें?'

'मूल आजारी, तीहि आजारी. आम्हीं मुलाला अनाथालयांत पाठवलें. दुसऱ्यांनीं मुलास मरूं दिलें असतें. परंतु मी जवळचे पैसे अनाथालयास मुलासाठीं दिले. परंतु शेवटीं मूल मेलें.'

'कसें होतें तें बाळ?'

'त्याच्याहून अधिक चांगलें बाळ मीं कधीं पाहिलें नाहीं. जगांत असें सुंदर मूल मिळालें नसतें. तुझीच प्रतिमा जणूं, तुझी छोटी मूर्ति!'

शेवटीं तो बाहेर आला. तेथें तीं मुलें उभीं होतीं. कडेवर मूल घेऊन एक अशक्त बाई तेथें उभी होती.

'ही ती गरीब बाई.' मुलें म्हणाली.

त्यानें तिला दहाच्या दोन नोटा दिल्या. आतां रस्त्यांत त्याच्याभोंवतीं गर्दी जमूं लागली. जो तो आपली करुण कहाणी सांगून मागूं लागला. तो कोणाला पांच, कोणाला दहा रुपये देत होता. त्याच्या खिशांतील सारे पैसे संपले. एक बाई येऊन म्हणाली,

'माझी जरा गाय गेली तर कोंडवाड्यांत घालून ठेवली तुमच्या दिवाणजीनें. मुलांना काय देऊं? ती गाय सोडायला सांगा. कोठून आणूं कोंडवाड्याची फी? म्हणतो फी भर नाहीं तर कामाला ये चार दिवस. मीं का गाय मुद्दाम दवडली? मूल रडत होतें म्हणून जरा गेलें तर इकडे गाय गेली. मला तो दिवाणजी म्हणाला, 'कां गेलीस गायीला सोडून?' पोराला कोण तो पाजणार होता? आणि गाईनें कांहीं नुकसान केलें असतें तर गोष्ट निराळी. म्हणे मी गुरें कोंडवाड्यांत न घातलीं तर गवत तरी राहील का?' ती असें बोलत होती तों दिवाणजीच तेथें आले.

'माझी गाय आजपर्यंत कधीं गेली होती तुमच्या गवतांत? सांगा. हे धनी आहेत येथें.'

'अग पण चार दिवस कामाला ये. मी गाय आतां सोडतों.'

'येईन कामाला. गाय आधीं सोडा. तिला गवताची काडीसुद्धां खायला तुम्हीं घातली नाहीं. पाणी तरी तरी पाजलें आहे कां? मुकें जनावर, कोठें फेडाल पापें? सार्‍यांचे तळतळाट घेऊन कोठल्या नरकाची धन करणार आहांत?'

'तुमची गाय देतील हां.'

'द्या. मी करूं तरी काय काय? नवरा दारू पितो, सासू पडून असते. इकडची काडी तिकडे करील तर शपथ! मी थकून जातें दादा.'

त्यानें तिला पांच रुपये दिले. तो घरीं आला. गांवांतील ती गरिबी, ती हलाखी, ती दुर्दशा व ते अन्याय पाहून तो बेचैन झाला होता. हे लोक अन्याय सहन करतात तरी कसे? आणि आम्ही एवढा अन्याय करूं कसें शकतों? तो विचार करीत बसला. रात्रीं तो जेवला नाहीं. तो अंगणांत फेर्‍या घालीत होता. हे खोत, हे जमीनदार एवढाल्या जमीनदार्‍या, खोत्या ठेवूं कसे शकतात? सर्वत्र या चोरांचे हक्क. आणि श्रमणार्‍यांचा

हक्क कोठेंच नाहीं ! त्याला फक्त उपाशी मरणाचा हक्क ! आम्ही जमीनदार कां सारे दगड बनलों आहोंत ? येथें माणसें उपाशी मरत आहेत. त्यांना खायला नाहीं. आणि आम्ही चैन करीत आहोंत. माझ्यासाठीं येथें श्रीखंड-पुरीचें जेवण आणि त्या लक्ष्मीच्या पोरांना दुधाचा टाक नाहीं. शेतकऱ्यांच्या घरीं दूध-दुभतें नाहीं. कारण कुरण नसल्यामुळें, सर्वत्र मोफत गायरानें नसल्या-मुळें, त्यांना गाईगुरें ठेवतां येत नाहीं. आणि पुरेशी शेती जवळ नसल्यामुळें घरांत दाणा नाहीं. यांना अन्न नाहीं, वस्त्र नाहीं, कांहीं नाहीं. आणि या जमिनदारांनीं सूटबुटांत फिरावें, बंगले बांधावे, रेडिओ ऐकावे, मोटारी उडवाव्या. रिस्टवॉचें लावावीं. शेतकरी गरीब कां म्हणून ? शेंकडों वेळां चौकशी झाली. परंतु मूळ प्रश्नाला कोणीच हात घालीत नाहीं. वर वर मलमपट्टी, थातुरमातुर प्रयोग ! जमीन एकाच्या ताब्यांत असतांच कामा नये. हवा, पाणी, प्रकाश याच्यावर सर्वांची सत्ता; त्याप्रमाणें जमीनहि सर्वांच्या मालकीची हवी. मीं परवां आईची जमीन खंडानें दिली ती चूकच. मी माझ्याकडे मालकी काय म्हणून ठेवावी ?

विचार करतां करतां तो थकला. तो खालीं बसला. तो शेवटीं अंथरुणावर जाऊन पडला. बऱ्याच वेळानें त्याला झोंप लागली. सकाळीं तो उठला. प्रातर्विधि आटोपून स्नान करून साधा सदरा घालून तो बसला होता. दिवाणजीहि आले. एकेक शेतकरी करतां करतां बरेच जमले.

‘ मी जमिनीची कांहीं तरी नवीन व्यवस्था करायला आलों आहें. वाटलें तर सारी जमीन तुम्हांला देतों. ’ तो म्हणाला.

‘ आम्हांला नवीन कांहीं नको. जुनें आहे, तें ठीक आहे. आम्हांला बींबियाणें देत जा. त्याची फार अडचण पडते. आम्ही शिल्लक ठेवूं शकत नाहीं. आणि ऐनवेळीं भाव दसपट वाढतात. ’ एकजण म्हणाला.

‘ तुम्हांला जमीन नको ? ’ त्यानें विचारलें.

‘ नको. ’

‘ तुमच्याजवळ पुरेशी आहे ? ’

‘ नाहीं. ’

‘ मग, नको कां म्हणतां ? विचार करा. ’

‘ विचार करायला हवा. ’

‘ मी उद्यांचा दिवस येथें आहें. या विचार करून. ’ ते उठले. दिवाणजी प्रतापला म्हणाले, ‘ यांच्यांतील शहाण्या शहाण्यांना मी उद्यां बोलावतों. म्हणजे कांहीं तरी ठरेल. नाहीं तर सारा गोंधळ होईल. ’ ‘ ठीक, तसें करा. ’ तो म्हणाला.

ते शेतकरी आपसांत चर्चा करीत जात होते.

‘ म्हणे फुकट जमीन घ्या. कांहीं तरी मनांत काळेंबेरें असेल. ’

‘ घेईल आंगठा, सही आणि फसवील. नको म्हणावें जमीन. ’

असें बोलत ते जात होते.

प्रतापनें तो दिवस विश्रान्तींत घालवला. तो आरामखुर्चींत पडून होता. मनांत म्हणाला, ‘ मला माझें कर्तव्य करीत राहूं दे. रूपाच्या बाबतींत मी शेवटपर्यंत श्रद्धा सोडणार नाहीं. तें पाप आणि हें जमीनदारीचें पाप, दोन्ही पापांचें मला क्षालन करूं दे. एकाएकीं आकाशांत ढग जमून आले. काळे काळे ढग. विजाहि चमचम करीत होत्या. पांखरें आपापल्या घरट्यांत जाऊं लागलीं, निवाऱ्याची जागा शोधूं लागलीं. वारा सुटला. पानें सळसळत होतीं आणि पाऊस आला. टपटप पाणी पडूं लागलें. प्रताप उठून बाहेर आला. तो पावसाची गंमत पाहात होता.

‘ पाऊस पडे टापुरटुपुर
नदीला आला पुर ’

असा चरण तो गुणगुणूं लागला. जणूं तो एकदम बाळ झाला. निसर्गाचें लेंकरूं बनला. परंतु पुन्हां गंभीर झाला. त्याच्या हृदयावर ओझीं होतीं. तो बाळ होऊं शकत नव्हता. तो पुन्हां विचारांत रमला. ‘ या जीवनाचा काय अर्थ ? मी कां जगतों ? कशासाठीं हा माझा जन्म ? माझ्या मावश्या कशासाठीं जगल्या ? रूपा ? कां या साऱ्या ओढाताणी ? आणि जगांत नाना मोह, नाना युद्धें ? मी पूर्वीं कसा होतों ? कां बरें मी बेछूट वागूं लागलों ? कोण नाचवतें ? आपण का केवळ हेतुहीन बाहुलीं आहोंत ? नियतीच्या, नशिबाच्या हातांतील खेळणीं, एवढाच का या जीवनाला अर्थ ? आपल्या इच्छेनुरूप जीवनाला आकार नाहीं का देतां येणार ? इच्छा-स्वातंत्र्य, कर्म-स्वातंत्र्य आहे

कीं नाहीं ? दुसऱ्याच्या हातांतले का आपण पतंग आहोंत ? या सर्व जीवनाचा, या विश्वाचा हेतु काय ? विश्वंभराची इच्छा समजणें कठिण आहे; परंतु माझ्या हृदयांत त्याचा आवाज आहे. मला त्या आवाजानुरूप वागूं दे. त्यानेंच मनाला निश्चित शान्ति मिळेल. माझ्या हृदयांतील आवाज काय सांगत आहे तें मला नक्की कळून चुकलें आहे.' आतां मुसळधार पाऊस पडूं लागला. झाडेंमाडें जणूं वांकलीं. आणि प्रतापहि नम्र झाला होता. 'मी प्रभूचा दास आहें, त्याचा सेवक आहें. प्रभुत्वाची भावना माझ्या मनांत कदापि न येवो. नम्रपणें, निरहंकारपणें प्रभूची, जगाची शक्य ती सेवा मला करूं दे.' त्याला त्या विचारांत आनंद वाटला; परम समाधान वाटलें. आतां मनांत भीति नव्हती, संशय नव्हता, चंचलता नव्हती. आतां त्याला अगतिक, निराधार वाटत नव्हतें. प्रभु जवळ आहे असें त्याला वाटलें.

दिवस गेला. रात्रीं त्यानें फक्त फलाहार केला. थोडें दूध घेतलें. पाऊस जरा थांबला होता. आज पौर्णिमा होती. चंद्र शान्तपणें शोभत होता. आजूबाजूला थोडे थोडे ढग होते. तो त्या ढगांकडे बघत होता. चंद्राला गिळायला ते येत, परंतु चंद्र पुन्हां वर येई. त्याचा आत्मचंद्र वासना-विकारांच्या कचाट्यांतून असाच धडपडून मुक्त होत होता. तो घरांत आला. तो अंथरुणावर पडला. त्यानें मच्छरदाणी सोडली नाहीं. डांस चावत होते. ढेंकूणहि होते. तो मनांत म्हणाला, 'मी असाच पुढें ढेंकूणडांसांच्या संगतींत राहायला जाईन. नकोत वाडे, बंगले. गरिबांप्रमाणें मी राहीन. मला सारें सहन करायला शिकूं दे.' केव्हां तरी त्याला झोंप लागली.

दुसरा दिवस आला. शेतकऱ्यांचे, श्रमणाऱ्यांचे शहाणे पुढारी आले होते. ते सातजण होते. सारे बसले. चर्चा सुरू झाली.

'हें बघा, मोठी जमीन एकाच्या मालकीची असणें हें पाप आहे. जमीन विकणें, विकत घेणें—या गोष्टी म्हणजे गुन्हा झाला पाहिजे.' तो म्हणाला.

'बरोबर आहे तुमचें म्हणणें.' एक म्हातारा म्हणाला.

'माझी जमीन फक्त दोन बिघे आहे. बाकी मी खंडानें घेतों. विकत घ्यावी तर किंमती भरमसाट. आम्हीहि आपसांत चढाओढ करून जमीन-दाराचें उखळ पांढरें करतों.'

' बरोबर आहे तुमचें म्हणणें. म्हणूनच मी तुम्हांला ही जमीन देऊन टाकणार आहें. याबाबतींत विचार करायला आपण जमलों आहोंत. ' प्रताप म्हणाला.

' सर्वांना सारखी वांटून द्या. ' एकानें सुचविलें.

' हेंच बरें. ' दुसऱ्यानें पुष्टि दिली.

' परंतु उद्यां एकाला दोन मुलगे नि एकाला चार असले तर, आलीच पंचाईत. पुन्हां आली विषमता. आणि वांटून दिलेली जमीन एखादा पुन्हां विकायचाहि. प्रश्न सोपा नाहीं. ' सरळ नाकाचा एक तरतरीत मनुष्य म्हणाला.

' खरें आहे याचें म्हणणें. शेतकरी आळशी होतील. पुन्हां जमिनी श्रीमंतांनाच ते विकतील. येरे माझ्या मागल्या. '

' जो मशागत करील, स्वतः नांगरील, त्यालाच द्या. जमीन विकायला बंदी घाला. '

' किंवा सारी सामुदायिक ठेवा. जे नांगरतील, मशागत करतील त्यांना उत्पन्न समान वांटावें. '

' सर्वांजवळ नांगर हवेत, बैल सारखे हवेत. '

' आमचें कधींहि एकमत होणार नाहीं. तुम्हीच काय तें ठरवा. ' म्हातारा म्हणाला.

' प्रश्नच गुंतागुंतीचा आहे. जमीन वांटून देतांनाहि जमिनीचा मगदूर, तिचा कस, सारें बघायला हवें. नाहीं तर कोणाला काळीभोर जमीन जायची, तर कोणाला नापीक रेताड जायची. '

' जमीन देवाची. एका माणसाची नाहीं. ' प्रताप म्हणाला.

' बरोबर. ' सारे म्हणाले.

' सारी जमीन गांवच्या मालकीची करावी. मी तुमचा नामधारी मालक. तुमचा खंड कमी करतों. भरपूर जमीन खंडानें देतों. ज्याला चांगली जमीन अधिक येईल त्यानें खंड अधिक द्यावा. हे खंडाचे पैसे मी तुमच्या गांवच्या कल्याणासाठींच ठेवणार आहें. ते तुमच्याच श्रमाचे पैसे.. त्यांतून स्वस्त दरानें तुम्हांला कर्ज मिळत जाईल. अशी व्यवस्था केली तर चालेल? '

' चालेल. कांहीं तरी न्याय येऊं दे. श्रमणारा उपाशी न मरो. त्याची मुलेंबाळें, बायकामाणसें उघडीं न पडोत. '

ते सारे चर्चा करीत निघून गेले. रस्त्यांत एक बाई त्यांना म्हणाली, ' त्याच्याविषयीं शंका नका घेऊं. तो आत्म्याच्या पाठीमागें लागला आहे. परमार्थाकडे तो वळला आहे. त्याच्यावर विश्वास ठेवा. तो काल सारे पैसे गरिबांना देत होता. '

आज रात्रीं तो तेथून जायला निघाला. तें मावश्यांचें घर त्यानें विकून टाकायला सांगितलें. शेतकऱ्यांच्या बाबतींत काय काय करायचें तें त्यानें दिवाणजींस सांगितलें. तो त्यांनाहि रजा—कायमचीच—देणार होता. परंतु कांहीं दिवस त्यांची अजून जरूर होती. त्या घरांतील कांहीं महत्त्वाचीं पत्रें त्यानें बरोबर घेतलीं. तो रूपाचा फोटो त्यानें आधीच घेतला होता. घरांतील सारें सामान विकून टाकायला त्यानें सांगितलें.

तो परत शहरांत आला. त्याला आपल्या वडिलोपार्जित भव्य वाड्यांत आतां जाववेना. त्या ऐषआरामी प्रासादांत, सर्व सुखसोयींनीं संपन्न अशा त्या राजवाड्यांत त्याला जायला लाज वाटत होती. त्यानें एका निवासालयांत भाड्याच्या दोन खोल्या घेतल्या, तेथें तो उतरला. तो आपल्या त्या श्रीमंत घरीं गेला. त्या मोलकरणीस तो म्हणाला,

' हा वाडा मला नको. मी हा बहिणीला देऊं इच्छितों. ती सध्यां येथें नाहीं. ती आल्यावर तिला विचारीन. तिलाहि नको असला तर विकून टाकीन. परंतु मी अशा घरांत अतःपर राहाणार नाहीं. हें भव्य घर म्हणजे आमचें पाप आहे. ही श्रीमंती म्हणजे आम्ही केलेले अन्याय. मी जातों. थोडेसें सामान घेऊन जातों. '

जरुरीचें सामान तो घेऊन गेला. त्या दोन खोल्यांत सामान्य माणसाप्रमाणें तो राहूं लागला. तो स्वतःचे कपडे धुऊं लागला. स्वतःची खोली झाडूं लागला. स्वतःचें अंथरूण घालूं लागला, काढूं लागला. प्रतापचा जणूं पुनर्जन्म होत होता. त्याला नवजीवन प्राप्त होत होतें.

तो तुरुंगांतील स्वीकृत कर्तव्यें पार पाडायला बाहेर पडला. वाटेंत त्याला एक जुना लष्करी अधिकारी भेटला. प्रतापचा तो लष्करी मित्र होता.

' काय रे प्रताप, तूं असतोस तरी कोठें ? किती दिवसांनीं लेका भेटलास ? चल, एका हॉटेलांत जाऊं. आज आपण एकत्र जेवूं, नाहीं म्हणूं नकोस. '

' आणि विश्वास तूं इकडे कोठें ? '

‘ एका लक्षाधिशाच्या इस्टेटीची व्यवस्था सध्यां मी बघत असतों. अरे शेतकरी पै वसूल देत ना. हजारों एकर जमीन. शेतकरी चैन करताहेत. अरे मीं त्यांना सुतासारखें सरळ आणलें. त्या जमीनदाराचें सारें कर्ज मीं फेडलें. मलाहि भरपूर फायदा झाला. तें जाऊं दे. कोठें जेवायचें आपण ? ’

‘ मला वेळ नाहीं रे. ’

‘ कशांत गुंतला आहेस ? शर्यतींना येणार का ? ’

‘ नाहीं. ’

‘ तूं का विरक्त झालास ? कोठें चाललास ? कोणत्या कामांत एवढा गर्क आहेस ? ’

‘ मी एका वकिलाकडे जात आहें. ’

‘ हो, तूं तुरुंग-सुधारणा हातीं घेतली आहेस. ऐकलें खरें. मला तरी सांग तुझा कार्यक्रम. ’

‘ येथें रस्त्यांत काय सांगूं ? किती सांगूं ? ’

‘ तूं राहतोस तरी कोठें ? ’

‘ असाच कोठें तरी. अच्छा. जातों. रागवूं नको. ’

‘ अरे रागावेन कसा ? ’

प्रताप वेगानें तेथून सटकला. त्याचा तो अगडबंब मित्र त्याच्याकडे बघतच राहिला. प्रताप सरळ एका सुप्रसिद्ध वकिलाकडे आला. त्यानें त्या तरुणाची नि त्याच्या आईची सारी हकीगत सांगितली.

‘ अहो, त्यानेंच, त्या खानावळवाल्यानेंच स्वतः आग लावली. घराचा विमा उतरलेला. त्या तरुणाचा नि त्याच्या आईचा गुन्हा शाबीतहि झाला नाहीं. ’

‘ मी अपील करतों. अपिलांत सुटतील. ’

प्रतापनें तुरुंगांत उडाणटप्पूच्या, बेकारीच्या नांवानें डांबून ठेवलेल्या कांहीं माणसांचीहि हकीगत सांगितली. ‘ त्याबाबतींतहि लक्ष घाला. मी पैसे देईन खर्चाचे. ’ तो म्हणाला.

तीं दोन कामें आटोपून तो जेलखात्याच्या सर्वप्रमुख अधिकाऱ्याच्या भेटीस गेला. तो अधिकारी अध्यात्मवादी म्हणून प्रसिद्ध होता. प्रतापला वाटलें कीं या अध्यात्मवादी पुरुषाजवळ तरी थोडी दया, न्यायबुद्धि असेल.

अध्यात्मवाद्यांचें अध्यात्म पुस्तकांपुरतें, फावल्या वेळेस चर्चेपुरतें असतें ही गोष्ट त्याच्या लक्षांत आली नाहीं.

‘ या प्रतापराव. अलीकडे तुमच्यांत फार क्रान्ति झाली आहे असें ऐकतों. ’

‘ थोडेसें खरें आहे. मी तुमच्याकडे कामासाठीं आलों आहें. राजकीय कैद्यांसंबंधी काम आहे. नगरच्या किल्ल्यांत एक तरुण मुलगी स्थानबद्ध करून ठेवण्यांत आली आहे. तिचा खरोखर गुन्हा नाही. तिला सोडा तरी, निदान तिच्या आईची तिला भेट तरी घेतां येऊं दे. तिची आई तडफडत आहे. त्याच किल्ल्यांत दुसरा एक तरुण आहे. त्याला तुम्ही वाचायला, अभ्यास करायला, पुस्तकेंहि देत नाहीं. ’

‘ साफ खोटें. तेथें पुस्तकें आहेत. परंतु यांना वाचायला नकोत. किती तरी धार्मिक पुस्तकें तेथें आहेत. परंतु ती जशींच्या तशीं पडून आहेत. ’

‘ याला शास्त्रीय पुस्तकें हवीं आहेत. ’

‘ यांच्या नेहमी तक्रारी असतात. सारीं ढोंगें. सरकारविरुद्ध आरडा-ओरड करायची. खरें म्हणजे पूर्वीपेक्षां किती यांना सुख आहे ! ’

‘ त्याला लिहायसाठीं वह्या हव्या आहेत. ’

‘ त्यांना पाटी दिलेली आहे. लिहावें, पुसावें, पुन्हां लिहावें. वह्या कशाला हव्यात ? त्यांना गुप्तपणें बाहेर पत्रें पाठवायला हवीत. ’

‘ तुम्ही विचार करा. वर्षानुवर्षे तुम्ही या तरुणांना चौकशीशिवाय डांबून ठेवतां. त्यांचा वेळ तरी कसा जायचा ? तुमची ती धार्मिक पुस्तकें त्यांना नकोत. या तरुणांजवळ मानवतेचा धर्म आहे. धर्माचा काथ्याकूट, त्या स्वर्ग-नरकाच्या कल्पना, ते शनिमाहात्म्याचे धर्म त्यांना नको आहेत. पाटीवर लिहायला हे तरुण का कुकुली बाळें आहेत. तुरुंगांत ते एखादा अमर ग्रंथ लिहितील. ’

‘ या क्रान्तिकारकांचा कशावर विश्वास नसतो. ’

‘ असतो, क्रान्तीवर असतो. ’

‘ देवाधर्मावर नसतो. त्याला ते थोतांड म्हणतात. ’

‘ कारण ‘देव देव’ करणारे जनतेला पिळीत असतात. मी कालच खेड्यां-तून आलों. शेतकऱ्यांची दैना या डोळ्यांनीं पाहिली. मरेमरेतों ते काम

करतात; परंतु त्यांना पोटभर खायला नाहीं. आणि आपण ऐषआरामांत लोळत आहोंत नि धर्माच्या गप्पा मारीत आहोंत. या तरुणांजवळच, समाजांत मानवता यावी म्हणून धडपडणाऱ्या या तरुणांजवळच थोडासा तरी खरा धर्म आहे. हे तरुण हालअपेष्टा भोगीत आहेत, ध्येयासाठीं मरायला सिद्ध आहेत.'

'तुमचें एकूण म्हणणें काय? आम्हीं काम करावें नि पोटभर खाऊं मात्र नये.'

'तुम्ही खाऊं नका असें नाहीं मी सांगत. सर्वांनीं काम करावें नि सर्वांनी पोटभर खावें.'

'प्रताप, तुझें लक्षण एकंदरींत ठीक दिसत नाहीं. तुझी आई असती तर तुला असें वागूं देती ना.'

इतक्यांत दुसरे कोणी तरी एक बडे गृहस्थ पत्नीसह तेथें आले.

'या, आज हा प्रताप आला आहे.'

'काय म्हणतो आहे?'

'तो मला सांगत आहे, 'मरेमरेतों काम करा. साधा सदरा घाला. चटणीभाकर खा.' प्रताप, आणखी काय करूं?'

'माझें तेवढें काम करा.'

'त्या मुलीच्या सुटकेचें माझ्या हातांत नाहीं. आईच्या भेटीचें बघेन. काय रे, या मुलींनी कशाला हा धुडगूस घालावा? लग्न करावें, संसार करावा. तें सोडून या यांना नसत्या उठाठेवी. त्यांना दुसऱ्यांस मदत करायचीच असेल तर दुसरे का मार्ग नाहींत? बॉंब, पिस्तुल, हींच साधनें हवींत वाटतें.'

'तुम्ही मुलींना निराळें कां काढतां? स्त्रिया काय, पुरुष काय, दोघें मानव आहेत. मानवता दोघांची सारखीच. दोघांना हृदय, बुद्धि, मन आहे. अन्यायाविरुद्ध पुरुषांच्या आत्म्यानें बंड करावें नि स्त्रियांनीं का गप्प बसावें? जाऊं देत या चर्चा. तुम्ही त्या मुलीला भेटीची तरी परवानगी द्या. तिच्या सुटकेविषयी मी प्रांताधिपतींसच पत्र लिहितों. मी जातों आतां. तुमचा वेळ घेतला. माफ करा.' असें म्हणून इतर पाहुण्यांसहि वंदून तो गेला.

दोन-चार दिवस कामांतच गेले. प्रतापनें त्या किल्ल्यांतील मुलीसाठीं गव्हर्नरास पत्र लिहिलें. त्या बाबतींत एका बड्या अधिकाऱ्यासहि तो भेटला. तो त्यांना म्हणाला,

‘ ती मुलगी निरपराधी आहे. हे पोलीस वाटेल त्याला पकडतात. सरकारहि त्यांच्यावर भरंवसा ठेवतें. ’

‘ प्रतापराव, सरकारला जीं माणसें मिळतात, त्यांना घेऊनच कारभार चालवावा लागतो. तूं कांहीं सरकारी नोकरी करीत नाहींस ? सदसद्विवेक-बुद्धीला मानणारे सारे दूर राहातात नि केवळ टीका करतात. सरकारला तुम्हीं कां मदत करू नये ? सरकारी राज्ययंत्रापासून सारीं चांगलीं माणसें दूर राहिलीं तर सरकारी कारभार तरी सुधारणार कसा ? तुम्हांला सुधारणा हवी असेल तर स्वत: काम करायला या तूं या मुलीला निरपराधी म्हणतोस. तुला काय माहीत ? तिच्याजवळ आक्षेपार्ह वाङ्मय सांपडलें. ’

‘ परंतु तिला तें माहीत नव्हतें. एका दुसऱ्या स्त्रीनें ठेवायला दिलें. हिनें ठेवलें. ’

‘ मी गव्हर्नरांना भेटेन. तुझ्यासाठीं म्हणून. परंतु माझें ऐक. तूं या क्रांतिकारकांच्या नादीं लागूं नकोस. ’

‘ तुम्ही या मुलीच्या बाबतींत कांहीं तरी करा. मी येतों. ’

‘ अरे, आज एक धर्मप्रवचन आहे. येतोस का प्रताप ? तुझ्या वडिलांचा नि माझा किती घरोबा. तूं मला मुलासारखाच आहेस. येतोस ? मोटारींतून जाऊं. ’

त्याला नाहीं म्हणवेना. मोटारींत बसून ते प्रवचनाला गेले. एका बड्या शेठजींच्या दिवाणखान्यांत तें धर्मप्रवचन होतें. बडेबडे व्यापारी, मोठमोठे अधिकारी आले होते. सोन्यामोत्यांनीं नटलेल्या स्त्रिया आल्या होत्या. प्रवचन सुरू होतें. प्रवचनकार दाढीवाले होते. डोक्याला भगवें गुंडाळलेलें होतें. जवळ छाटी होती.

‘ क्षणभर तरी विचार करा. आपण कधीं विचारच करीत नाहीं. या देहाचें सार्थक करायचें आहे. परलोकाचा विचार तरी कधीं मनांत येतो तेथें तोंड तरी दाखवतां येईल का ? तुम्हांला क्षमा केली जाणार नाहीं. तुम्हांला मोक्ष नाहीं. तुम्ही सारे नरकाचे धनी होणार ! अरेरे ! धाडधाड

तुम्ही त्या नरकाच्या खाईत पडाल, रडाल, ओरडाल. कोण येईल सोडवायला ? बाप हो, कांहीं विचार करा. त्या यमाचे दूत तुम्हांला करकचून बांधून नेतील. तप्त खांबांना तुम्हांला कवटाळावें लागेल. आधणाच्या पाण्यांतून जावें लागेल. खरोखर, तुमच्या आत्म्याचें होणार तरी काय ? कोणाचा तुम्हांस आधार ? कोण तुम्हांस तारील ? या नरकापासून तुम्हांस कोण वांचवील ? बंधूंनो, आपलें सारें घर पेटलें आहे. सारें घर. अरे, कोण वांचवील तुम्हांला ? हरहर, पाप. भयंकर पाप ! '

असें म्हणून प्रवचनकार रडूं लागले. आणि श्रोत्यांचेहि डोळे भरून आले. प्रवचन पुढें चालू झालें—

' परंतु घाबरूं नका. संतांची तपश्चर्या तुम्हांस तारील. खिस्ताच्या बलिदानानें जगाच्या पापाचें प्रायश्चित्त घेतलें आहे. संत स्वतःचा बळी देतात नि तुम्हांला पापमुक्त करीत असतात. तुम्हांला आशा आहे. धीर धरा. '

प्रतापला तें कृत्रिम प्रवचन ऐकवेना. नरकाचीं भेसूर वर्णनें विसाव्या शतकांत ऐकवणें मूर्खपणा आहे. पृथ्वीवर ठायींठायीं आम्हीं दैन्यदारिद्र्य-दास्याचे नरक निर्मिले आहेत, त्याविषयीं हे प्रवचनकार, कीर्तनकार बोलतील तर शपथ. संतांचें बलिदान तुम्हां आम्हांला कसें तारणार ? जो तो स्वतःस तारीत असतो. प्रत्येकानें सुधारल्याशिवाय उद्धार कसा होणार ? ज्यानें त्यानें सत्कर्म आचरलें पाहिजे, कर्तव्य केलें पाहिजे. संतांवर बोजा घालून कार्यभार होत नसतो. प्रत्येकाच्या हृदयांतील संतत्व जागृत व्हायला हवें, कर्मांत प्रकट व्हायला हवें.

' मी जातों. ' प्रताप म्हणाला.

' किती सुंदर प्रवचन. ' तो अधिकारी म्हणाला.

' मला काम आहे. '

' मोटर नको ? '

' नको. मी जाईन. '

असें म्हणून प्रताप उठून निघून गेला. त्याच्याकडे श्रोतृवृंदानें पाहिलें. प्रवचनकाराचेहि डोळे त्याच्याकडे गेले. परंतु प्रताप सरळ निघून गेला.

त्या किल्ल्यांतील स्थानबद्ध तरुणीच्या आईचा पत्ता त्याच्याजवळ होता. आपण केलेली सर्व खटपट त्या मातेच्या कानांवर घालावी व तिला धीर



घ्यावा असें वाटून तो एके दिवशी तिच्याकडे जायला निघाला. तो त्या बिऱ्हाडीं आला. चष्मा लावलेली एक पोक्त बाई तेथें कांही तरी वाचीत होती.

‘ कोण पाहिजे आपल्याला ? ’ तिनें विचारलें.

‘ मी प्रतापराव. तुमच्या मुलीसंबंधीं शक्य तें सारें केलें आहे. ’

‘ तुम्ही का ते ? या. माझी मुलगी आज सकाळीच सुटून आली. तुमचे किती आभार मानूं ? बसा या खुर्चीवर बसा. मी तिला बोलावतें. ती शेजारीं गेली आहे. मी काल सायंकाळी तुमच्या वाड्यांत गेलें होतें. कारण काल ताराची तार आली होती. तुम्ही हल्लीं वाड्यांत राहात नाहीं वाटतें ? ’

‘ तेथें नाहीं राहात. तुमची तारा सुटून आली ! छान. इतक्या लौकर काम होईल असें वाटलें नव्हतें. ’

इतक्यांत तारा आली. ती सडपातळ होती. ती अशक्त झाली होती.

‘ सरकारला जिची धास्ती वाटे ती का तूं ? ’ त्यानें विचारलें.

‘ माझी तारा शूर आहे, निर्भय आहे. जगासाठीं निःस्वार्थपणानें ती काम करीत आहे. ’ माता म्हणाली.

‘ माझ्यासारखीं हजारों तरुण माणसें आतां क्रान्तीच्या कामाला लागलीं आहेत. यांत आतां वाखाणण्यासारखें काय आहे ? आजूबाजूचा अन्याय

बघून मनुष्य स्वस्थ कसा बसतो, याचें आश्चर्य वाटावें. तो अन्याय दूर करायला तो उठतो यांत कसलें आश्चर्य? मला स्थानबद्ध व्हावें लागलें याचें मला वाईट नाहीं वाटत. वाईट वाटतें तें याचें कीं तुरुंगांत आपण व्यक्ति न राहातां जणूं वस्तु बनतों. आपल्या कपड्यांवर नंबर; छातीवर कैदी-नंबरचा बिल्ला; आपण जणूं एक गांठोडें बनतों. तुरुंगांत सकाळसंध्याकाळ 'गिनती' करतात. दिवसपाळीचे शिपाई रात्रपाळीवाल्याच्या स्वाधीन करतांना म्हणतात, 'चारशें कैदी बराबर, साब.' जणूं इतके इतके नग ताब्यांत घ्यायचे, ताब्यांत द्यायचे!'

'तुम्ही लौकर बऱ्या व्हा. सुटल्यात, आईला भेटल्यात बरें झालें. सुखी असा. मी जातों.' तो म्हणाला.

'मी तुमची ऋणी आहें.' माता म्हणाली.

'तुमची मुलगी समाजांत न्याय यावा, समता यावी म्हणून धडपडत आहे. समाजानें तुमचें ऋणी असायला हवें. अशा तेजस्वी, त्यागी मुलीला तुम्ही जन्म दिलांत आई, तुम्ही धन्य आहांत!'

असें म्हणून तो निघाला. वाटेंत तो लष्करी मित्र त्याला परत भेटला.

'अरे, तूं रात्रीं गाण्याला येशील का? ती प्रख्यात नटी आज गाणार आहे. ती जशी मोटी अभिनयसम्राज्ञी आहे, तशीच उत्कृष्ट गाणारीहि आहे.'

'मी नाहीं येणार.'

'तूं असा अरसिक कसा? कलांना उत्तेजन देणें म्हणजे संस्कृति आणि संस्कृति नसेल तर, मानवी जीवनाला अर्थ काय?'

'मी गर्दीत आहें, जातों.' असें म्हणून मित्राच्या हातांतून आपला हात सोडवून घेऊन प्रताप विचार करीत वेगानें निघून गेला.

तो विचार करीत जात होता. संस्कृति म्हणजे काय? कला म्हणजे काय? विलास, सुखभोग, माकडचेष्टा, पशुता, म्हणजे का जीवनांतील कला नी काव्य? जीवनांत जें खरोखर महत्त्वाचें त्याला हे प्रतिष्ठित लोक त्याज्य समजतात; जें जें मोलाचें तें तें त्यांना भिकार वाटतें. यांच्या या संस्कृतीच्या झगमगाटाखालीं अन्याय, जुलूम, विषमता, विलास, ऐषआराम.—थोडक्यांत म्हणजें सर्व प्रकारच्या घाणीचें मढें दडवलेलें असतें.

तो आपल्या खोलींत गेला. परंतु त्या बॅरिस्टराकडे जाऊन रूपाच्या अर्जाचें काय झालें तें विचारून यावें असें मनांत येऊन तो पुन्हां बाहेर पडला. ते बॅरिस्टर बाहेर जाण्याच्या गडबडींत होते.

'मी तुम्हांला कळवणारच होतों. अर्ज फेटाळला गेला. हे मोठमोठे कायदेपंडितहि वरवरच्या गोष्टी बघतात. एका वेश्येचा अर्ज म्हणूनच आधीं कांहींनीं कपाळास आंठ्या घातल्या. न्यायमूर्तींच्या त्या समितींत शिक्षा कायमच झाली. मीं करणें शक्य होतें तें सारें केलें.'

'आतां पुढें ?'

'राजाकडे अर्ज करा.'

'वाईट झालें. ती निरपराधी होती.'

'तुम्ही कोणा तरी बड्या माणसाकडून गव्हर्नरसाहेबांकडे, लाटसाहेबांकडे वशिला लावा.'

'जें शक्य तें करीन. तुमची फी ?'

'कारकून सांगतील. घाई नाहीं.'

बॅरिस्टर निघून गेले. प्रतापनें वर जाऊन कारकुनाजवळ पैसे दिले. प्रताप दुःखीकष्टी झाला होता. आतां एकच मार्ग मोकळा होता. निराशेंतील एकच आशा आतां होती. बादशहांकडे दयेचा अर्ज करायचा. परंतु अर्जाचें उत्तर येण्यापूर्वीच रूपा इतर कैद्यांबरोबर काळ्या पाण्यावर पाठवली गेली असती. तो तिच्याबरोबर जायला मनानें तयार झाला होता. जमिनीची अजून नीट व्यवस्था लावायची होती. एके ठिकाणची जमीन कुळांनाच दिली होती. त्यांनीं खंड द्यावा, परंतु तो गांवाच्या सुधारणेसाठीं, गांवाच्या कल्याणासाठींच खर्च केला जावा अशी त्यानें व्यवस्था केली होती. तें सारें कायदेशीर अजून करायचें होतें. दुसऱ्या ठिकाणच्या जमिनीचा खंड अजून ठरवायचा होता. स्वतःच्या खर्चापुरता घेऊन बाकीचा सारा खंड तो गांवाच्या हितार्थच खर्च करणार होता. परंतु स्वतःच्या खर्चाला किती लागेल याची त्याला कल्पना नव्हती. तिकडे काळ्या पाण्यावरच राहायचें झालें तर किती खर्च येईल ? आणि रूपा सुटली तर पुन्हां संसार मांडतां येईल का ? काय काय होईल पुढें ? त्याला कांहींच अंदाज येईना. या दुसऱ्या ठिकाणच्या जमिनीचा खंडहि त्यानें निम्म्यानें कमी केलाच होता, परंतु अजून सर्वस्वीं

सोडचिठी त्यानें दिली नव्हती.

आज रूपाला ‘ न्यायमूर्तींच्या मंडळानें अर्ज फेटाळला. आतां फक्त राजाकडे दयेचा अर्ज करायचा ’ हें सांगण्यासाठीं तो तुरुंगांत जायला निघाला. त्यानें अर्ज नीट लिहून आणला होता. रूपाची त्याच्यावर सही घ्यायची होती. तो तुरुंगांत आला. तेथें दवाखान्याचा द्वाररक्षक होता. त्यानें प्रतापला ओळखलें.

‘ तुम्हीं तिला दवाखान्यांत उगीच ठेवायला सांगितलेंत. तिला तेथून पुन्हां मूळच्या कोठडींत पाठवण्यांत आलें. असलीं माणसें फुकट. ’ तो म्हणाला.

‘ कां ? काय केलें तिनें ? ’ प्रतापनें विचारलें.

‘ तेथें शेण खाल्लेंन. तेथील दुय्यम डॉक्टराजवळ लघळपणा करूं लागली. मुख्य डॉक्टरानें तिला हांकलून दिलें. ’

ती बातमी ऐकून प्रतापला वाईट वाटलें. त्याचा स्वाभिमान दुखावला गेला. ‘ मी तुझ्याजवळ लग्न लावीन असें हिला मी सांगत असतों. तरी हिनें असें करावें ! या माकडचेष्टा कराव्या ! ती माझा त्याग स्वीकारायला तयार नाहीं. मागच्या भेटीच्या वेळेस तिनें किती हट्टीपणा दाखवला. काय म्हणून तिनें मला क्षमा करावी ? माझें सारें करणें मानभावीपणाचें तिला कां बरें वाटूं नये ? परंतु ती जर मला तुच्छच लेखीत असेल, तर मी आतां तिच्या-संबंधींच्या कर्तव्यांतून मुक्त नाहीं का झालों ? मी काळया पाण्यावर तिच्या-बरोबर कशाला जाऊं ? आम्हीं एकत्र राहाण्याची शक्यता नाहीं. ती पति म्हणून माझा स्वीकार करणार नाहीं. मग अतःपर माझें काय कर्तव्य ? ’ असे विचार त्याच्या मनांत येत होते. इतक्यांत जेलर तेथें आला. तो नवीन होता.

‘ काय आहे काम ? ’

‘ रूपाची भेट. ती कैदी आहे.’

‘ ठराविक दिवशीं भेट मिळते. आज मिळणार नाहीं. आधीं अर्ज करा. ’

‘ परंतु मला वाटेल तेव्हां भेटायची परवानगी आहे. गव्हर्नरची परवानगी आहे. परवानगीपत्र माझ्या खिशांत आहे. त्याप्रमाणेंच एका राजकीय कैद्याचीहि भेट हवी आहे. ’

' राजकीय कैद्यांच्या भेटी बंद करण्यांत आल्या आहेत. ही कोण रूपा आहे तिची भेट मिळेल. ' जेलर म्हणाला.

एक शिपाई रूपाला बोलवायला गेला. आणि ती आली. आज तो थोडा कठोर झाला होता. परंतु कर्तव्य म्हणून तो तिच्याशीं बोलूं लागला.

' तुझ्यासंबंधींचा अर्ज फेटाळला गेला. वाईट झालें.' तो म्हणाला.

' मला वाटलेंच होतें ' ती म्हणाली. ती दुःखी होती. तिची छाती खालींवर होत होती. ' तुला असें कां वाटत होतें. ' म्हणून विचारायचें त्याच्या मनांत होतें. परंतु त्यानें विचारलें नाहीं. तिच्या डोळयांत त्याला अश्रू दिसले, परंतु त्या अश्रूंनीं त्याला आज करुणामय बनविलें नाहीं. त्याला तिची अधिकच चीड आली. परंतु त्यानें आपली तिरस्कारभावना आंवरली.

' निराश नको होऊं. राजाकडे अर्ज करूं. मीं अर्ज आणला आहे. त्याच्यावर सही कर. यश येईल. धीर धर. ' तो म्हणाला.

' मी त्या गोष्टीचा नाहीं विचार करीत. '

' मग कसला ? '

' मी दवाखान्यांत होतें. येथें तुम्हांला त्यांनीं कांहीं सांगितलें असेल, परंतु... '

' जाऊं दे. तूं नि तुझ्या भानगडी, नकोत त्या ऐकायला. ' तो कपाळाला आंठ्या घालून म्हणाला. थोडा वेळ कोणी कांहीं बोललें नाहीं. नंतर त्यानें खिशांतून अर्ज काढला.

' येथें सही कर. ' तो म्हणाला.

तिनें अर्ज हातांत घेतला. तो तिच्या पाठीशीं उभा राहून तिच्या सहीकडे बघत होता. त्याच्या मनांत पुन्हां दया, प्रेम यांच्या भावना आल्या. गरीब बिचारी रूपा. आणि त्यानें केलेल्या पापामुळेंच ती या स्थितीला येऊन पोंचली नव्हती का ? त्याच्या मनांत स्वतःचें पाप आधीं उभें राहिलें कीं तिच्याविषयींची करुणा ? कांहीं असो. आपणच अपराधी असें त्याला वाटलें आणि म्हणून तो करुणेनें तिच्याकडे पाहूं लागला. तिनें सही केली. बोटाला लागलेली शाई तिनें केसांना पुसली, नेसूंच्या कैदी पातळाला पुसली. ती उभी राहिली. तिनें त्याच्याकडे पाहिलें.



' हें बघ रूपा, कांहींहि होवो. माझा निश्चय अभंग आहे. मी बोलल्या-प्रमाणें सारें करीन. ते तुला कोठेंहि नेवोत. मी तुझ्याबरोबर असेन. ' तो म्हणाला. आपण तिला क्षमा केली हा विचार मनांत येऊन त्याच्या दयेच्या नि करुणेच्या भावना अधिकच कोमल झाल्या होत्या. अधिकच उदात्त झाल्या होत्या, परमोच्च स्थितीला पोंचल्या होत्या.

' काय उपयोग ? ' ती म्हणाली.

‘ आतां तुम्हांला काळया पाण्यावर नेतील. वाटेंत काय काय लागेल त्याचा विचार करून ठेव. ’

‘ मला कांहीं नको. कशाला करतां हें सारें ? पुरेत हे उपकार. ’ ती म्हणाली.

प्रताप उठला. वेळ संपली असें जेलरनें सांगण्यापूर्वींच तो उठला. हृदयांत अपार शान्ति नि आनंद भरून आलीं होतीं. प्राणिमात्राविषयीं त्या क्षणीं त्याला प्रेम वाटत होतें. रूपा कशीहि वागली तरी आपल्या हृदयांतील प्रेम कमी होणार नाहीं या विचारानें त्याला कृतार्थता वाटत होती. आजपर्यंत अशा परमोच्च जीवनाचा त्याला कधीं अनुभव आला नव्हता. रूपानें दवाखान्यांत कांहीं भानगड केली. करू दे. मी तिजवर प्रेम करतों तें तिच्यासाठीं म्हणून, प्रभूसाठीं म्हणून. मी माझ्या स्वार्थासाठीं थोडेंच प्रेम करतों आहें.

खरें म्हणजे दवाखान्यांत रूपानें कांहीं केलें नव्हतें. ती तेथें कांहीं काम करीत होती. इतक्यांत तिला सतावणारा तो दुय्यम डॉक्टर तिच्याशीं फाजिलपणानें बोलूं लागला. तिला संताप आला. तिनें त्याला जोरानें ढकललें. तेथील एका फळीला त्याचा धक्का लागला. तिच्यावरील बाटल्या खालीं पडल्या नि खळकन फुटल्या. इतक्यांत मुख्य डॉक्टर तिकडून जात होता. रूपा हळूच तिकडून जात होती. लज्जा, क्रोध यांनीं तिचा चेहरा लालसर दिसत होता.

‘ हा काय चावटपणा चालला आहे ? येथें दवाखान्यांत असें वर्तन चालणार नाहीं. मी येथून तुम्हांला काढून टाकीन. ’ तो मुख्य डॉक्टर म्हणाला.

आणि त्याच दिवशीं तिला दवाखान्यांतून काढून टाकण्यांत आलें. कोणीहि आपल्याला पतित समजावें, आपला अपमान करावा, आपल्याकडे भोगी दृष्टीनें पाहावें याचें तिला वाईट वाटलें. त्या दिवशीं तिला रडूं आलें. ज्या वेळेस ती प्रतापला भेटायला गेली, त्या वेळेस आपण निरपराधी आहों असें ती त्याला सांगणार होती. परंतु ‘ तुझें वर्तन नि तूं... ’ असें तो म्हणाला. आपणांवर त्याचा विश्वास नाहीं असें तिला वाटलें. आपण आपली बाजू मांडली तर त्याला अधिकच संशय येईल असें मनांत येऊन ती अधिक

कांहीं बोलली नाहीं. दोन वेळच्या भेटींत जरी ती त्याच्याजवळ कठोरपणें वागली होती, ती त्याला क्षमा करायला तयार दिसली नाहीं, तरी अलीकडे ती त्याच्यावर नकळत प्रेम करूं लागली होती. त्याच्या इच्छेप्रमाणें ती वागूं लागली होती. त्याला बरें वाटावें म्हणून ती दवाखान्यांत जाऊं लागली. नटणेंमुरडणें तिनें सोडलें. विडीसिगारेट ओढणें सोडलें. ती जरी त्याच्या-जवळ लग्न करायला तयार होत नव्हती तरी त्याच्याविषयीं तिला मनांत आदर होता. आपणांजवळ लग्न केल्यामुळें त्याची सामाजिक प्रतिष्ठा नष्ट होईल म्हणून ती लग्नाला तयार होत नव्हती. परंतु आज त्याचा आपल्या सद्वर्तनावर विश्वास नाहीं असें पाहून ती दुःखी झाली. आपण दवाखा-न्यांत नीट वागलों नाहीं असें प्रतापला खात्रीपूर्वक वाटावें याचें तिला शिक्षा कायम झाली या बातमीपेक्षांहि अधिक वाईट वाटलें. त्याला भेटून गेल्यावर ती रडली.

आणि प्रताप रस्त्यानें जात होता. त्याच्या मनांत सर्वच कैद्यांविषयीं आज अपार करुणा भरली होती. हे हजारों कैदी तुरुंगांतून कां खितपत पडलेले असतात? खरोखर काय असतो यांचा अपराध? काय या सर्वांचा गुन्हा? कैद्यांचे पांच प्रकार त्याच्या डोळ्यांसमोर आले. पहिला वर्ग रूपासारख्यांचा. अगतिक होऊन अशीं माणसें गुन्हा करतात. त्यांचा हेतुहि नसतो. त्यांची परिस्थितिच अशी असते कीं लोक त्यांच्याकडे येतात नि भानगडी होतात. दुसरा प्रकार म्हणजे द्वेषमत्सरादि विशिष्ट भावनेच्या आहारीं जाऊन गुन्हा करणाऱ्यांचा. त्या त्या परिस्थितींत कोणीहि तसाच वागतो. कैद्यांपैकीं निम्मे कैदी या दुसऱ्या प्रकारांतले असतात. ती भावना ओसरल्यावर त्यांना वाईट वाटतें. परंतु, कायदा यंत्रवत् असतो. आणि या कैद्यांना वर्षानुवर्षें तुरुंग भोगावा लागतो. तिसरा वर्ग अशांचा असतो कीं, आपण कांहीं खरोखर गुन्हा करीत आहोंत असें त्यांना वाटत नसतें. केवळ कायदा म्हणतो म्हणून गुन्हा. खोताच्या मालकीची सर्वत्र जमीन. जरा गवत कापलें, लांकूडफांटे नेले तर गुन्हा होतो. हा का खरोखर गुन्हा? हजारों एकर जमीन स्वतः बळकावून बसणाराच वास्तविक गुन्हेगार. परंतु शिक्षा होते मोळीविक्या मोलकरणीला, गवत नेणाऱ्या गरीब शेतकऱ्याला!

चौथा प्रकार राज्यकर्त्यांपेक्षां जे स्वतःला नैतिक दृष्ट्या श्रेष्ठ समजतात अशांचा. कोणी स्वातंत्र्यासाठीं बंड करणारे, समाजवाद आणूं पाहाणारे, कोणी संप करणारे ! या वर्गात किती तरी उच्च प्रकारचीं माणसें असतात. बुद्धीने मूलगामी, हृदयानें थोर अशीं ! परंतु त्यांचीं जीवनें अंधारांत जात असतात ! आणि पांचवा प्रकार अशांचा कीं, जर समाजानें नीट वागवलें असतें तर जे गुन्हेगार झाले नसते ! खरोखर हे लोक निष्पाप असतात. कोणाला खायला नसतें म्हणून ब्रेड चोरतो. कोणी बेकार म्हणून कोठें चोरी करतो. त्यांना धंदा द्यावा. ते सारे स्वाभिमानी जीवन जगतील. त्याला तुरुंगांतील वेश्येचा एक मुलगा आठवला. त्याला लहानपणापासून भली संगति मिळालीच नाहीं, आणि शेवटीं तुरुंगांत येऊन पडला. प्रतापला तो तुरुंगांत भेटला तेव्हां म्हणाला, 'हे वकील, हे कायदेपंडित, हे तुरुंग, हे कायदे आम्हांला सुधारण्यासाठीं सारें आहे परंतु आम्हांला सुधारणारी एक वस्तु कोठेंच मिळत नाहीं. आमचा स्वाभिमान राखणारी सहानुभूतीची वागणूक ! आम्हांला धंदा शिकवा, कला शिकवा. आमच्याकडे मानवतेच्या दृष्टीनें पाहा. परतु तें दूरच राहिलें. वेटे आम्हांला सुधारूं पाहातात. परंतु स्वतःच मनानें अधःपतित असतात !' खरें नाहीं का त्याचें बोलणें. आणि तो दुसरा तरुण ! त्याच्या बापाचें शेतभात गेलेलें. तो लष्करांत जातो. अधिकाऱ्याच्या प्रेमपात्रावर तोहि प्रेम करूं लागतो. शेवटी तुरुंगांत येऊन पडतो. त्या तरुणाचा स्वभाव भावनामय होता. परंतु त्यांना सुसंस्कृत वळण कोणीं लावलें नाहीं. जीवन केवळ वेछूट भोगासाठीं असेंच तो धरून चालला. त्याच्यावरचे अंमलदार तसेच होते. भोगी किडे !

प्रताप विचार करीत जात होता. इतर माणसांप्रमाणेंच हीं तुरुंगांतील माणसें. कांहीं तुरुंगांत पडलीं, कांही बाहेर आहेत. या बाहेरच्यांना तुरुंगांत असणाऱ्यांचा न्याय करण्याचा काय म्हणून अधिकार ?

तो विचार करीत घरीं आला. तों तेथें एक चिठी होती. त्याची बहीण आली होती. तिनें त्याला भेटायला बोलावलें होतें. बरेच वर्षांत बहीण-भावाची भेट नव्हती. बहिणीचा नवरा सरकारी वकील होता. आपण फार मोठे असें त्याला वाटे. प्रतापला त्याचा तिरस्कार येई. आपली बहीण याच्यावर कशी प्रेम करते याचें त्याला आश्चर्य वाटे. लहानपणची थोर

स्वभावाची माझी बहीण ! ती का केवळ दिडक्यांना महत्त्व देणारी झाली ? परंतु तिला भेटायला तो निघाला. बहीण घरींच होती. तिचा नवरा थकल्यामुळें झोंपला होता. वास्तविक उठायची वेळ झाली होती. परंतु अजून उठला नव्हता.

' ताई, तुझी चिठी मिळाली. ' तो म्हणाला.

' अरे, प्रथम मी जुन्या वाड्यांत गेलें. तूं तेथें राहात नाहींस असें कळलें. ती आईच्या वेळची मोलकरीण तेथें राहाते. तूं घर विकायला निघाला होतास कळलें. वेडा. आणि एवढें घर सोडून भाड्याच्या दोन खोल्या घेऊन राहातोस ? '

' काय करायची जास्त जागा ? तूं बरी आहेस ना ? बरीच जाडजूड झाली आहेस. तिकडची हवा चांगलीच मानवली वाटतें. '

' परंतु तूं किती वाळलेला दिसतोस ? तूं का आजारी आहेस ? आणि ती एक चिंता तूं लावून घेतली आहेस ? '

' तुला सारें समजलें वाटतें. '

' सारें कळलें. प्रताप, अरे ती बाई का आतां सुधारेल ? सात-आठ वर्षें तिनें कुंटणखान्यांत काढलीं. कशी सुधारणार रे ती ? '

' तिच्या सुधारण्याचा प्रश्न नाहीं. हा माझ्या सुधारण्याचा प्रश्न आहे ! '

' तिच्याशीं लग्न लावणें हाच का याला उपाय ? '

' हा त्यांतल्या त्यांत उत्तम मार्ग. शिवाय मी अशा लोकांत जाईन जेथें मी त्यांच्या उपयोगीं पडूं शकेन. '

' तूं अशानें सुखी होशील असें वाटत नाहीं. '

' माझ्या सुखाचा प्रश्न नाहीं. '

' तिला हृदय असेल तर तीहि सुखी होणें अशक्य आहे. '

' तिलाहि सुखाची इच्छा नाहीं. '

' ठीक. परंतु जीवनांत... '

' जीवनांत ? काय हवें जीवनांत ? '

' जीवनाला अनेक गोष्टींची जरूर असते. '

' जीवनांत एकाच गोष्टीची जरूर आहे आणि ती म्हणजे ज्यानें त्यानें योग्य तें करणें. '

'मला नाहीं समजत तुझें बोलणें.'

त्याला बहिणीची कींव आली. हीच का ती माझी बहीण, कोमल भावनांची, उदार हृदयाची असें त्याच्या मनांत आलें. लहानपणच्या कोमल अशा शतस्मृती डोळ्यांसमोर आल्या. लग्न झालें. हा स्वार्थी नवरा गळ्यांत पडला. आणि माझ्या बहिणीच्या सर्व सुसंस्कृत, कोमल भावना का नष्ट होऊन जाव्यात? त्यानें करुणेनें बहिणीकडे पाहिलें.

इतक्यांत तिचे गलेलठ्ठ धष्टपुष्ट यजमान उठून आले. आंखूड बाह्यांचा सदरा अंगांत होता. ते केसाळ हात दणकट दिसत होते.

'बहीणभावाचें काय चाललें आहे बोलणें? माझ्यामुळें व्यत्यय तर नाहीं ना आला?' तो म्हणाला.

'मुळींच नाहीं. आमचें कांहीं गुप्त बोलणें नाहीं. मी त्याला त्याच्या करण्यांतील हेतु विचारीत होतें. त्या मुलीशीं, मुलगी कसली, ती निगरगट्ट वेश्या, तिच्याशी हा लग्न लावूं म्हणतो, तिच्याबरोबर काळ्या पाण्यावर जाऊं म्हणतो! कांहीं तरीच याचें करणें.'

'खरेंच प्रताप. मला बोलण्याचा काय अधिकार? परंतु तुमची बहीण माझी पत्नी. आमच्या प्रतिष्ठेलाहि तुमच्या अशा करण्यानें धक्का नाहीं का बसत? मोठमोठ्यांकडे आम्हांला जावें लागतें. कोणी प्रश्न विचारला तर मान खालीं व्हायची. तुम्ही हें सारें कां करूं इच्छितां? कां त्या बाईशीं लग्न लावतां?'

'या स्त्रीच्या अधःपाताला मूळ कारण मी. म्हणून मी हें सारें करूं इच्छितों. मी अपराधी आणि तिला बिचारीला शिक्षा!'

'परंतु ती का दोषी नाहीं?'

'ती संपूर्णतः निर्दोषी आहे. ज्यूरींतील लोक अधिक काळजीपूर्वक वागते तर सजा होती ना.'

'वरतीं न्यायाधिशांचें महामंडळ आहे.'

'त्यांनीं अर्ज निकालांत काढला.'

'मग अर्ज करण्यांत कांहीं अर्थ नव्हता. न्यायाधीश उगीच नाहीं अर्ज फेटाळणार. आतां राजाकडे अर्ज करा.'

‘ केला आहे. परंतु तेथेंहि यशाची शक्यता नाहीं. कारण राजा मंत्रि-मंडळाला विचारणार. ते न्यायाधिशांना विचारणार. शेवटीं नकार येणार. आणि निरपराधी स्त्रीस शिक्षा होणार ! ’

‘ तुमची चुकीची समजूत आहे. मंत्री अस्सल कागदपत्र मागवून घेतील. कांहीं चूक असेल तर न्यायदानांत दुरुस्ती करतील. लक्षांत ठेवा कीं अपराध्यांनाच सजा होत असते. ’

‘ माझें मत तर उलट आहे. कायद्यानें ज्यांना सजा होते, अशांतील बरेचसे निरपराधी असतात. ’

‘ कोणत्या अर्थानें ? ’

‘ स्वच्छार्थानें, स्पष्टार्थानें. या रूपानें का विष दिलें होतें ? त्या दुसऱ्या एका शेतकऱ्यावर असाच खुनाचा खोटा खटला आहे. त्या एका माय-लेंकांवर घराला आग लावल्याचा अगदीं खोटा खटला भरण्यांत आला. मालकानेंच घराला आग लावली. घराचा विमा काढलेला आणि आरोप त्या मायलेंकांवर. कां ? तर त्या मातेच्या मुलीवर त्या मालकाची पापी दृष्टि ! परंतु शिक्षा त्या मायलेंकरांना ! किती उदाहरणें ! ’

‘ निर्दोष संस्था जगांत कोठून आणायची ? चुका होत नसतील असें नाहीं. ’

‘ समाज ज्याला वाईट म्हणतो असे कांहीं एक न केलेल्यांनाहि शिक्षा होत असतात. ’

‘ प्रताप, असें नाहीं हो होत. चोराला आपण चोरी करतों ही गोष्ट का माहीत नसते ? ’

‘ नसते माहीत. चोरी करूं नये त्याला सांगतात. परंतु कारखान्याचा मालक त्याच्या श्रमाचा मोबदला म्हणून दोन दिडक्या देतो नि हजारों रुपयांचा माल बळकावतो. तो का चोर नव्हे ? नाना प्रकारचे कर घेणारें सरकार का चोर नव्हे ? ’

‘ तूं का अराजकवादी आहेस ? सरकारच नको कीं काय ? ’

‘ मी कोणत्या मताचा मला माहीत नाहीं. वस्तुस्थिति काय ती मी सांगत आहें, सरकार लुबाडीत आहे. कारखानदार लुबाडीत आहेत, जमीनदार लुबाडीत आहेत. जमीन वास्तविक सर्वांच्या मालकीची. परंतु

शेतकऱ्याजवळून लुबाडून घेतलेल्या जमिनीवरील तो गवत कापून नेतो, कधीं एखादी फांदी तोडतो तर तुम्ही त्याला चोर म्हणतां, हातकड्या घालतां. त्या शेतकऱ्याला माहीत असतें कीं, खरें म्हणजे तुम्ही सारे चोर असतां. आणि स्वतःच्या कुटुंबासाठीं तुम्हीं त्याचें जें लुबाडलेंत त्यांतला कांहीं भाग नेणें म्हणजे आपले कर्तव्य आहे हें तो जाणतो.'

'मला तुमचें म्हणणें समजत नाहीं. समजलें तरी तें मला पटत नाहीं. जमीन कोणाच्या तरी मालकीची असणारच. आज तुम्ही समान वांटलीत तरी उद्यां पुन्हां जो अधिक उद्योगी नि कर्तृत्ववान आहे, त्याच्याच पाशीं ती पुन्हां सारी येणार.'

'परंतु जमीन ही देण्याघेण्याची वस्तुच असतां कामा नये. ती कोणाच्याहि मालकीची असतां कामा नये.'

'परंतु मालकी हक्क तर मनुष्याचा जन्मजात हक्क आहे. त्याच्याशिवाय मनुष्याला उद्योग करायला प्रेरणा तरी कशी राहील! मालकी हक्क नष्ट कराल तर पुन्हां रानटी अवस्थेंत मानवाला जावें लागेल!'

'सत्य तुम्ही म्हणतां त्याच्या अगदीं उलट आहे. जेव्हां जमीन कोणा एकाच्या मालकीची म्हणून राहाणार नाहीं तेव्हांच ती पडून राहाणार नाहीं. आज जमिनी ठायी ठायीं पडून आहेत. जमीनदार स्वतः लागवडीस आणीत नाहींत, दुसऱ्याला लागवडीस आणूं देत नाहीत.'

'प्रताप, तुझें म्हणणें सारें वेडेपणाचें आहे. जमिनीवरील मालकी हक्क अजिबात नाहींसा करणें या युगांत शक्य आहे? लहानपणापासून तुझें हें वेड आहे. परंतु प्रत्यक्ष कांहीं कृति करण्यापूर्वी नीट विचार कर.'

'म्हणजे माझ्या व्यक्तिगत कारभारासंबंधीं का तुमचें बोलणें आहे?'

'होय. वडिलोपार्जित जी मालमत्ता मिळाली, ती आपण नीट सांभाळून पुढील पिढीच्या हातीं दिली पाहिजे.'

'परंतु मला कर्तव्य वाटतें कीं...'

'मी माझ्या किंवा माझ्या मुलांच्या स्वार्थासाठीं हें बोलत नाहीं. माझ्या मुलांबाळांना कांहीं कमी पडणार नाहीं. देवाच्या कृपेनें मला भरपूर मिळत आहे. मी तुझ्या इस्टेटीसंबंधीं जें बोलत आहे तें तत्त्वनिष्ठेमुळें. तुम्हीं तें एक पुस्तक वाचलें आहे?'

‘ काय वाचायचें नि काय वाचायचें नाहीं तें माझें मी पाहीन ! ’ असें म्हणून प्रताप चहा पिऊं लागला. त्यानें विषय बदलला.

‘ तुझीं मुलेंबाळें कशीं आहेत ? ’ त्यानें बहिणीला विचारलें.

‘ आनंदी आहेत. अरे, लहानपणीं तूं तीन बाहुल्या घेऊन खेळायचास, अगदीं तशीं खेळतात बघ. ’

‘ तुला लहानपणचें अजून सारें आठवतें ? ’

‘ सारें आठवतें. ’

इतक्यांत पुन्हां वर्तमानपत्रांतील एका खटल्यावरून गोष्टी निघाल्या. आणि प्रताप म्हणाला,

‘ कायद्याचा हेतु न्याय देण्याचा कधींच नसतो. ’

‘ तर मग कायदा कशासाठीं असतो ? ’

‘ त्या त्या विशिष्ट वर्गांचे हितसंबंध पाळण्यासाठीं कायदा असतो. जी परिस्थिति आहे तीच कायदा ठेवूं इच्छितो, ज्यांच्या हातांत जमिनी, कारखानदारी आहे, ती तशीच कायदा ठेवूं इच्छितो. ’

‘ हें मी नवीनच ऐकतों आहें.’

‘ नवीन असलें तरी सत्य आहे. कायद्याला फरक करायची इच्छा नाहीं. आणि चांगल्या चांगल्या व्यक्तींचा कायद्यानें छळ करतात, त्यांना फांशीं देतात. सामान्य लोकांना कैदी म्हणून छळतात, असामान्य राजकीय कैद्यांना बंडखोर म्हणून छळतात. ’

‘ राजकीय कैदी असामान्य असतात असें मला वाटत नाहीं. पुष्कळदां समाजांतील अत्यंत हीनपतित असे ते लोक असतात. त्यांच्या डोक्यांत कांहीं तरी वेड भरवलें जातें आणि अत्याचारास ते प्रवृत्त होतात. ’

‘ परंतु मला अशा व्यक्ती माहीत आहेत कीं ज्या नैतिक दृष्ट्या न्यायधिशांपेक्षां शतपटींनीं श्रेष्ठ होत्या ! ’

‘ कायदा आहे तीच स्थिति राहावी असें नाहीं म्हणत. कायदा सुधारणा व्हावी म्हणून असतो. ’

‘ तुरुंग ही सुधारण्याची जागा ? तेथें जाऊन अधिकच बिघडतात व्यक्ति. ’

‘ मग करायचें तरी काय ? ’

'फौजदारी कायदा म्हणजे सारें थोतांड आहे.'

'मी तर रोज त्याचेंच समर्थन करीत असतों.'

'तें तुमचें तुम्ही पाहा. परंतु मला तें सारें अमानुष वाटतें, अर्थहीन वाटतें.'

'तुम्हांला अर्थहीन वाटतें तें दुसऱ्यांना वाटत नसेल. मला तसें वाटलें असतें तर मी नोकरी करतांना दिसलों नसतों.'

मेव्हणे उठले. त्यांना का प्रतापचें म्हणणें लागलें? त्यांचा अहंकार, स्वाभिमान का दुखवला गेला? त्यांच्या डोळ्यांत का अश्रू चमकले? ते आरामखुर्चीत जाऊन पडले, सिगारेट पेटवून धूर सोडूं लागले.

बहिणीचा निरोप घेऊन तो गेला. वादविवादाच्या भरांत आपण उगीच मन दुखेल असें बोललों. आपण बाजू मांडली ती खरी असली तरी सौम्य रीतीनें ती मांडतां आली असती असें मनांत येऊन दुःखी झाला.



आज तुरुंगांतून जवळजवळ सहाशें कैदी काळ्या पाण्यावर पाठवण्यांत येणार होते. त्यांत पन्नास स्त्रिया होत्या. प्रताप त्यांच्याबरोबर जाणार होता. कैद्यांची खास गाडी आधीं जाणार होती. प्रतापला त्या गाडीनें जातां येत नव्हतें. नंतर दोन तासांनीं निघणाऱ्या गाडीनें तो जाणार होता. त्यानें सारी तयारी केली, खोल्यांचें भाडें दिलें, जरूर तेवढे कपडे नि पैसे घेऊन तो निघाला.

तो तुरुंगाच्या दाराजवळ आला. दुपारची वेळ. उन्हाळ्याचे ते दिवस. आणि कैदी बाहेर काढण्यांत येत होते. सर्वांची नोंद होत होती. खाणाखुणा तपासण्यांत येत होत्या. सर्वांना तो एकरंगी कैदी पोषाख, त्या विचित्र टोप्या डोक्यांत. मानवतेला न शोभणारें सारें असायचें. त्या कैद्यांत म्हातारे होते, तरुण होते. अशक्त होते, सशक्त होते. स्त्रिया होत्या. कांहींचीं मुलें बरोबर होतीं. तिकडे काळ्या पाण्यावर त्यांना एकत्र राहतां आलें असतें. त्या सर्वांचें सामान लॉऱ्यांत घालण्यांत आलें. अत्यन्त अशक्त नि आजारी कैद्यांना त्यांत बसविण्यांत आलें. बाकीचे कैदी रांगेत उभे होते. दोघा-दोघांना हातकड्यांनीं एकत्र बांधण्यांत आलें होतें. ते पाहा हत्यारी पोलीस. त्यांच्या स्वाधीन सारे कैदी करण्यांत आले.

ती बघा रूपा. प्रतापनें तिला ओळखलें. तो धांवत तेथें गेला. तिच्या-जवळ एक गरोदर स्त्री कैदी उभी होती. उन्हानें ती कोमेजून गेली होती. तिच्या पोटांत कळा येत होत्या. परंतु तेथें माणुसकीला जागा नव्हती. आणि ती एक शेतकरीण तेथें होती. प्रतापनें तिची हकीगत मागें ऐकली होती. नवऱ्याचा एकदां तिला राग आला होता. भाकरींत विष घातलें तिनें. ती तुरुंगांत गेली. परंतु घरीं शेतीच्या कामाचे दिवस. नवरा मेला नव्हता. तिलाहि तुरुंगांत वाईट वाटलें. खटला भरण्याच्या आधींच त्यानें तिला सोडवून आणलें. आणि ती म्हणाली, ' मीं वेड्यासारखें कांहीं तरी केलें. क्षमा करा. ' ' अग क्षमा कधींच केली. ' तो म्हणाला. ती सासूसासऱ्यांच्या पाया पडली. आणि शेतांत कामाला जाऊं लागली. कापणीचे दिवस. खसाखसा विळा चालवी. रात्री दोर वळून ठेवी सकाळीं कापलेल्या धान्याच्या जुड्या बांधायला. सासूसासऱ्यांना सून फारच आवडूं लागली. चार दिवस तुरुंगांत जाऊन आली परंतु तिच्यांत केवढें परिवर्तन ! आणि एक दिवस पुन्हां पोलीस आले. म्हणाले हिच्यावर खटला भरायचा आहे. नवरा म्हणाला, ' आमचें कांहीं म्हणणें नाहीं. तिला आम्हीं क्षमा केली आहे. ' सासूसासरे रडूं लागले. परंतु तिला खुनी म्हणून नेण्यांत आलें. आणि तिला काळ्या पाण्याची शिक्षा झाली. तिचा नवरा मागूनच्या गाडीनें जाणार होता. तोहि तिच्याबरोबर स्वेच्छेनें काळें पाणी भोगायला जाणार होता. रूपाजवळ त्याची ती तरुण पत्नी उभी होती.

' रूपा, सामान पाठवलेलें मिळालें ? ' प्रतापनें विचारलें.

' हो. ' ती म्हणाली.

इतक्यांत एक अंमलदार तेथें आला ' अहो, बोलणें कायद्याविरुद्ध आहे. दूर व्हा. आमच्यावर जबाबदारी असते. ' परंतु थोड्या वेळानें प्रतापला त्या अंमलदारानें ओळखलें. नम्रपणानें तो म्हणाला, ' एकदां सारे स्टेशनवर पोचूं दे मग तेथें थोडें बोला. '

' चलो ' हुकूम झाला.

आणि ते शेंकडों कैदी निघाले. खळखळ आवाज होत होते. कोणाचीं पावलें मोठ्या कष्टानें पडत होतीं. 'पाव उठाव, पाव उठाव' पोलीस ओरडत



होते. पाय चटचट भाजत होते. ते रस्ते आगीसारखे होते. कोणाला तहान लागली. परंतु वाटेंत पाणी कोण देणार ?

ती एक घोड्याची गाडी येत आहे ती कोणाची ?

रस्ता कैद्यांनीं भरून गेला होता. गाडी थांबली. गाडींत एक श्रीमंत मनुष्य होता. त्याची बायको होती. त्याचीं दोन मुलें गाडींत होतीं.

‘ गाडी थांबवा. ’ पोलीस म्हणाले.

‘ गाडीला जागा द्या. ’ गाडीवान म्हणाला.

आंत कोणी बडा माणूस आहे असें गाडीच्या थाटावरून वाटत होतें. पोलीस विनयानें म्हणाला, ‘ त्या कोपऱ्यावर आम्ही वळूं. तोंवर हळूहळू हांका गाडी. ’

मुलांनीं गाडींतून बाहेर पाहिलें. मुलीनें विचारलें, ‘ आई, कोण हे लोक ? यांना कोठें नेत आहेत ? ’ परंतु आईबापांची कठोर मुद्रा पाहून ती गप्प बसली. हे निराळ्याच जातीचे प्राणी असावेत असा तिनें तर्क केला. परंतु



तिचा तो भाऊ! तो करुणेनें बाहेर बघत होता. त्याचे काळेभोर, निर्मळ, निष्पाप डोळे त्या दीन मानवजातीकडे बघत होते. आपल्यासारखेच हे प्राणी. परंतु कोणीतरी त्यांना छळीत आहे असें त्याला वाटलें. तो वेडावांकडा पोषाख, सर्वांचें मुंडन केलेलें, त्या शृंखला! त्या मुलाला वाईट वाटलें. रडूं येऊं नये म्हणून तो ओठ चावीत होता.

प्रताप पायींच त्या कैद्यांच्या पाठोपाठ जात होता. परंतु तो दमला. त्यानें एक गाडी केली. गाडी हळूहळू जात होती. त्याला तहान लागली. गाडी थांबवून तो एका हॉटेलांत शिरला. त्यानें थंड पेय घेतलें. गाडींत बसून तो निघाला. कैदी बरेच दूर गेले होते. परंतु रस्त्यांत ती कसली गर्दी! हा एक कैदी रस्त्यांत उष्णतेचा प्रहार होऊन पडला वाटतें! तोंड लाललाल आहे. डोळे रक्ताळ आहेत. तो कण्हत होता. एक पोलीस तेथें उभा होता.

‘ तो मरेल. ’ एक म्हातारी बाई दुःखानें म्हणाली.

‘ त्याचीं बटनें तरी म्हणावें सैल करा ’ दुसरा कोणी म्हणाला.

‘ अशा अशक्तांना अशा उन्हांत बाहेर काढतात तरी कशाला? ’ तिसरें कोणी उद्गारलें.

‘ तुम्ही चालते व्हा. तुमचें येथें काम नाहीं ’ पोलीस गरजला.

‘ परंतु ज्यांचें काम आहे ते तर दुर्लक्ष करतात ? माणसांना असें मारणें का बरें ? कैदी असला तरी तोहि मनुष्य आहे. ’ रस्त्यांतील लोक म्हणाले.

इतक्यांत प्रताप तेथें आला.

‘ त्याचें डोकें वर उचलून त्याला पाणी द्यायला हवें.’ तो वांकून म्हणाला.

‘ तुम्ही दूर व्हा. पाणी आणायला माणूस पाठवला आहे. ’ पोलीस म्हणाला.

इतक्यांत एक बडा अधिकारी तेथें आला. चकचकीत बूट, लखलखीत बटणें, हातांत वेताची छडी, असा कोणी आला.

‘ येथें उभे नका कोणी राहूं. व्हा दूर ’ तो अधिकारवाणीनें म्हणाला.

लोक पांगले. त्यानें पोलिसास गाडी आणायला सांगितलें.

‘ गाडी येत आहे. ’ पोलीस म्हणाला.

‘ आधीं पाणी आणा. ’ प्रताप बोलला.

अधिकाऱ्यानें कठोरपणें प्रतापकडे पाहिलें. परंतु तो कांहीं बोलला नाहीं. इतक्यांत पाणी आलें.

‘ ओता त्याच्या डोक्यावर. ’ अधिकारी म्हणाला.

त्याच्या डोक्यावरची टोपी काढून पाणी ओतण्यांत आलें. त्यानें डोळे उघडले. थोडें पाणी तोंडांत घालण्यांत आलें. परंतु त्याचें सारें अंग थरथरत होतें. छाती धांपा टाकीत होती.

गाडी येईना.

‘ ही यांची गाडी घ्या. ’ पोलीस म्हणाला.

‘ ही दिलेली आहे. ’ तो गाडीवान म्हणाला.

‘ कांहीं हरकत नाहीं. तूं याला पोंचव. मी तुझें भाडें देईन. ’ प्रताप म्हणाला.

त्या गाडींत त्या कैद्याला ठेवण्यांत आलें. पोलीस नि तो अंमलदार गाडींत बसले. त्या कैद्याची ती टोपी रस्त्यांत पडली होती. पोलिसानें त्या मरणोन्मुख कैद्याच्या डोक्यावर ती पुन्हां ठेवली ! सरकारी सामान सारें व्यवस्थित हवें.

गाडीपाठोपाठ प्रताप गेला. आलें पोलीसस्टेशन. त्या कैद्याला उचलून आंत नेण्यांत आलें. प्रतापहि मागोमाग गेला. तेथें एक वेडा होता. ‘ मला

हे सतावतात. मला वेडा म्हणतात. माझ्यावर प्रयोग करतात. मला भीति घालूं बघतात. परंतु मी यांच्या बापाला भिणार नाहीं. ' असें तो वेडा बोलूं लागला. प्रतापला अडवून सांगूं लागला. परंतु प्रतापचें लक्ष नव्हतें.

डॉक्टर आला.

' सारें संपलें. ' त्यानें तपासून सांगितलें.

' नीट तपासा. ' अधिकारी म्हणाला.

' इतक्या दिवस धंदा करतों आहे. हजामती नाहीं करीत. ' डॉक्टर अभिमानानें म्हणाला.

' नेऊं त्याला खालीं ! उद्यां मूठमाती देऊं. '

' न्या. '

निर्णय देऊन डॉक्टर गेले. तें प्रेत उचलून खालीं तळघरांत नेऊन ठेवणार होते. प्रताप पाठोपाठ जात होता.

' तुम्हांला काय पाहिजे ? ' कोणीं त्याला हटकलें.

' कांहीं नको. ' तो म्हणाला.

' जा मागें. येऊं नका. '

प्रताप मागें फिरला. तो पोलीस चौकींतून बाहेर आला. ती गाडी धुऊन स्वच्छ करण्यांत आली होती. प्रताप तिच्यांत बसणार तों पुन्हां एक कैदी आणण्यांत आला. तोहि उन्हाच्या झळीनें पडला होता. त्याचेहि प्राण गेले होते. हा दुसरा कैदी. पुन्हां डॉक्टर आला.

' कशाला मेलेल्यांना तपासायला मला बोलावतां ? ' तो म्हणाला.

' तेंच तर तुमचें काम. मेला असें तुम्ही सांगितलेंत कीं आम्हांला पुढचें सारें करतां येतें. तुमच्या सर्टिफिकिटाशिवाय मनुष्य मरत नसतो. '

' बरें तर. हा मेला. '

' कां असे कैदी मरत आहेत ? ' प्रतापनें विचारलें.

' अहो, आज उन्हाळा किती आहे ! अशा उन्हांत का यांनीं कैद्यांना काढायचें ? परंतु यांची तारीख ठरलेली असते. मग ऊन असो, पाऊस असो, थंडी असो. निर्जीव यंत्राप्रमाणें काम. हा म्हणेल त्यांचा हुकूम, तो म्हणेल त्यांचा ! सारे कायद्यानें जाणारे. जबाबदार कोणीच नाहीं. हे कैदी

तुरुंगांतील कोठड्यांतून बंद असतात. नाहीं लागत ऊन, नाहीं वारा. आणि एकदम बाहेर काढतात. नाहीं कोणाला सोसत. मरतात. तुम्ही कोण ? '

' असाच एक कोणी तरी. '

' अच्छा. मला वेळ नाहीं ' असें म्हणून डॉक्टर गेला. प्रतापहि विचार करीत बाहेर पडला. त्याला स्टेशनवर पोंचायचें होतें. तो गाडींत बसला. आला स्टेशनवर. ती कैद्यांची खास गाडी तयार होती. प्रत्येक डब्यांत खच्चून कैदी कोंबण्यांत आले होते. प्रताप घाईघाईनें रूपा कोठें आहे पाहूं लागला. कोणीं त्याला आडवलें. त्यानें त्याच्या मुठींत एक नोट कोंबली.

' जा, परंतु लौकर आटपा. ' तो अधिकारी म्हणाला आणि त्याला रूपा दिसली. तिनें त्याच्याकडे पाहिलें.

' किती उकडतें आहे. ' ती म्हणाली.

' मीं पाठवलेल्या वस्तु मिळाल्या ? ' त्यानें विचारलें.

' हो. मी आभारी आहें. किती तुम्ही माझ्यासाठीं करतां ! ' ती म्हणाली.

' आणखी कांहीं पाहिजे का ? '

' कांहीं नको. '

' थोडें पाणी द्याल का ? ' ती शेतकरीण म्हणाली.

' खरेंच पाणी द्या आणून ' रूपा म्हणाली.

' डब्यांत पाणी नाहीं ? '

' होतें तें कधींच संपलें. ऊन मी म्हणत आहे. साऱ्यांचे घसे पुनःपुन्हां कोरडे होतात. '

' मी अधिकाऱ्याला सांगतों हां. '

' आणि तुम्ही का बरोबर येत आहांत ? '

' हो. मागूनच्या गाडीनें. मी तुम्हांला वाटेंत गांठीन. '

' का हो १२ माणसें उन्हानें मेलीं खरें का ? '

' मीं बारांचें ऐकलें नाहीं. परंतु दोन मीं पाहिले. '

' दुष्ट आहेत मेले. कोणीच का यांना शिक्षा नाहीं करणार ? कोणीच का आमची दाद घेणारें नाहीं ? '

' तुम्हां स्त्रियांपैकीं कोणी आजारी नाहीं ना ? '

‘ पुरुषांपेक्षां स्त्रिया सहनशील असतात. आमच्यापैकी कोणी आजारी नाही. फक्त एकीच्या मनांत आतांच बाळंत व्हायचें आलें. ती पलीकडच्या डब्यांत विव्हळत आहे. तिला येथें उतरवून नाहीं का घेण्यांत येणार ? ’ एक स्त्री म्हणाली.

‘ तुला कांहीं हवें का तुम्हीं विचारलेंत. त्या बाईला येथेंच ठेवतील असें कांहीं करा. ’ रूपा म्हणाली.

‘ आणि माझ्या नवऱ्याची भेट नाहीं का होणार ? ते येणार आहेत मागूनच्या गाडीनें. ’ त्या शेतकरणीनें विचारलें.

‘ पुरें बोलणें. व्हा चालते. ’ एक अधिकारी येऊन म्हणाला.

‘ अहो, ती एक स्त्री कैदी बाळंत होत आहे. तिला येथेंच उतरवून घ्या. तुरुंगांत पाठवा. पुढें केव्हां तिला पाठवा. ’ प्रताप म्हणाला.

‘ होऊं दे बाळंत. कांहीं हरकत नाहीं. आम्ही पुढें बघूं. आतां नाहीं वेळ ’ तो अधिकारी म्हणाला. गाडीची शिट्टी झाली. स्टेशनांतील घंटा वाजली.

प्रताप आणि त्या शेतकरणीचा नवरा किसन दोघे तेथें उभे होते. किसनला पत्नीजवळ बोलतां आलें नाहीं.

प्रतापच्या गाडीला अजून दोन तास अवकाश होता. तो प्लॅटफार्मवर उभा होता. इतक्यांत एक कामगार येऊन म्हणाला, ‘ तुम्ही का प्रताप ? ’

‘ हो. ’

‘ तिकडे एक बाई आहेत. त्या तुम्हांला भेटूं इच्छितात. ’

प्रताप गेला. तों त्याला त्याची बहीण भेटली.

‘ तूं कोठें इकडे ? ’ त्यानें विचारलें.

‘ आम्हीहि जात आहोंत. तूं जात आहेस. होय ना ? ’

‘ हो. ’

‘ आमची गाडी आधीं आहे. तुझ्या उलट दिशेनें आम्हांला जायचें. ’

‘ आपले मार्गच उलट. ताई, काल मी जरा रागानें बोललों. तुझ्या पतीचें मन दुखवलें गेलें असेल. मीं क्षमा करा म्हणून पत्रहि लिहिलें. परंतु खिशांत राहिलें हें बघ. ’

त्यानें तिच्या हातांत तें पत्र दिलें.

‘ तूं मनाचा आहेसच थोर. ’ ती म्हणाली.

‘ आणि हें बघ, आईचें घर आहे ना, तें तुझ्या नांवानें मीं ठेवलें आहे. तसेंच जी जमीन मीं अजून कुळांना दिली नाहीं, ती मी मेलों म्हणजे तुझ्या मुलांची होईल. ’

‘ नको रे असें बोलूं. ’

‘ त्या एका गांवच्या जमिनीशिवाय बाकी सारें मीं देऊन टाकलें आहे. मीं लग्न केलें तरी मूलबाळ मला होणार नाहीं... ’

‘ प्रताप, तूं रडवतोस हो मला. ’

परंतु तिचा नवरा आला. त्यांच्या गाडीची वेळ झाली. पोर्टरनें सामान उचललें.

‘ अच्छा. ’ तिचा पति म्हणाला.

‘ राग नका धरूं. क्षमस्व. ’ प्रताप म्हणाला.

‘ तुझा स्वभाव मी जाणतों. ’

‘ आणि प्रताप तिसऱ्या वर्गानें जाऊं नको. निदान दुसरा वर्ग तरी. ’ बहीण म्हणाली.

‘ तिसरा वर्गच बरा. तो किसनहि मजबरोबर आहे. तिसऱ्या वर्गातील दुनियाच मला बघायची आहे. बाकी पाहून झाली. ’

तीं गेलीं. प्रताप तेथेंच उभा होता. तो आणखी पुढें पोंचवीत गेला नाहीं. बहिणीला घर, शेतीवाडी राहणार असें ऐकून किती आनंद झाला तें त्यानें पाहिलें होतें. इतकी का ती संसारी बनली असें त्याच्या मनांत आलें. कोठें आहे ती लहानपणची बहीण? श्रमणाऱ्यांचा आधीं हक्क असें माझ्याबरोबर म्हणणारी? ती का मुलाबाळांच्या सुखांत रमली? पतीच्या संगतींत राहून तीहि का संकुचित बनली? ही का जीवनाची फलश्रुति? हा का विकास? परंतु हे बडे लोक यालाच कृतार्थता मानतात. तो वेटिंग-रूममधील एका खुर्चींत बसला. तो खिन्न नि उदास होता.

●●●

प्रताप आगगाडींत बसला. तिसऱ्या वर्गाचा तो डबा होता. सर्व प्रकारचे लोक त्यांत होते. कामगार, शेतकरी, रस्त्यावर खडी फोडणारे, नाना प्रकारचे लोक. प्रतापचें लक्ष नव्हतें. त्या दोन मेलेल्या कैद्यांचाच

विचार त्याच्या डोक्यांत होता. हा खूनच नव्हे का? त्या दोन कैद्यांचा खूनच नाहीं का यांनीं केला? आणि असे किती मारले जात असतील! परंतु याला जबाबदार कोण? जो तो आपला हुकूम बजावणारा. ज्याला त्याला आपल्या ऑफिसचें महत्त्व. मानवाला किंमतच नाहीं! मानवासंबंधीं आपलें कांहीं कर्तव्य आहे, या सर्व कायद्यांपेक्षां, वरिष्ठांच्या हुकुमांपेक्षांहि तें श्रेष्ठ आहे, असें यांना वाटतच नाहीं. मानवजातीविषयीं क्षणभर जर प्रेम उद्‌भवलें, सर्वांविषयीं बंधुभाव वाटला तर बिनदिक्कतपणें अशीं कृत्यें करायला मनुष्य तयार होणार नाहीं. मानवाविषयीं प्रेम हाच सुधारणेचा उपाय!

प्रताप आपल्या विचारांत मग्न होता. हवेंत बदल झालेला त्याच्या लक्षांतहि आला नाहीं. तो पाहा एक भला मोठा ढग पश्चिमेकडून येत आहे. सूर्याला त्यानें झांकाळलें. आणि दूर डोंगराकडे चांगलाच पाऊस पडत होता. येथेंहि पडूं लागला. मधून मधून ढगांना फाडून वीज चमकत होती. गडगडाटहि होत होता. सरसर पाऊस येऊं लागला. प्रतापच्या कोटावर पाणी येऊं लागलें. ओल्या मातीचा सुगंध आला. हिरवींगार शेतें दुरून दिसत होतीं. मधून मधून फळबागा होत्या. बटाट्यांचीं शेतें होतीं. पावसामुळें हिरवें अधिकच हिरवेंगार दिसूं लागलें, पिवळें अधिकच पिवळें धमक दिसूं लागलें, काळें अधिकच काळें कुळकुळीत दिसूं लागलें.

'किती सुंदर, सुंदर!' प्रताप उद्गारला.

बाहेरची रमणीय सृष्टि तो पाहात होता. परंतु तो पाऊस टिकला नाहीं. एकदोन ढग आले, त्यांनीं वृष्टि केली. ते रिकामे झाले नि गेले. पूर्वेच्या बाजूला सुंदर इंद्रधनुष्य दिसूं लागलें. त्यांतील जांभळा रंग फारच स्पष्ट दिसत होता. गाडी पुढें जात होती. त्याला दगडधोंडेहि दिसत होते. पाऊस पडला तरी तेथें हिरवें नव्हतें. प्रतापला वाटलें हे दगड येथें कशाला? हे पाणी पृथ्वींत शिरूं देत नाहींत, तिला सस्यश्यामल होऊं देत नाहींत. या दगडांचीहि जरूर असेल. परंतु पृथ्वीचें मुख्य कार्य त्यांनीं मारतां नाहीं कामा. धान्य, फुलें, फळें, हिरवेंगार गवत, झाडेंमाडें हें पृथ्वीचें वैभव आहे. त्याच्या आड हे दगडधोंडे येतील तर काय कामाचे? हे सरकारी

अंमलदारहि जरूरीचे असतील. परंतु त्यांनीं मानवी भावनांना पारखें नाहीं होता कामा. हे लोक कायद्याचें स्तोम माजवतात. परंतु मानवी हृदयावर अभंग खोदलेला भूतदयेचा कायदा, परस्परांविषयीं प्रेम नि सहानुभूतीचा कायदा, तो मात्र हे मानीत नाहींत. सर्व कायद्यांचा वास्तविक जो आधार, असा तो देवाचा विश्वव्यापक कायदा, तो मात्र हे मानीत नाहींत. हे अंमलदार डोळ्यांसमोर नकोत असें वाटतें. जणूं डाकू, दरोडेखोर अशांप्रमाणें ते वाटतात. दरोडेखोरांसहि एखादेवेळेस दयामाया वाटत असेल, परंतु या अंमलदारांच्या मनांतून ती साफ मेलेली असते. तंट्या भिल्ल, उमाजी नाईक हे का दरोडेखोर होते? नाहीं. हे मोठमोठे अंमलदार, हे ऑफीसर हे खरे दरोडेखोर, हे खरे राक्षस ! आणि पुन्हां यांच्या दुष्ट कृत्यां-बद्दल कोणी जबाबदार नाहीं ! वरपासून खालपर्यंत सरकारी संबंधांची एक निर्जीव यांत्रिक सांखळी असते. जो तो म्हणतो मी हुकमाचा ताबेदार. मनुष्यांना निर्जीव ठोकळ्यांप्रमाणे हे मानतात. मानवी संबंधानुसार वैऱ्यांशीं वा कोणाशीहि वागायला हवें ही यांना जाणीवहि नसते. कांहीं कांहीं बाबतींत प्रेम वगैरे गोष्टी बाजूला ठेवाव्या लागतात असें मनुष्य मानतो म्हणून हे प्रकार होतात. परंतु प्रेमाचा, मानवी सहानुभूतीचा कायदा कधींच दूर ठेवतां येणार नाहीं. वस्तूंजवळ तुम्ही प्रेमशून्यतेनें वागाल. झाडें तोडाल, दगड फोडाल, माती तुडवाल, विटा भाजाल, लोखंड तापवाल, तें घणानें ठोकाल. परंतु मानवाजवळ का त्याला निर्जीव निष्प्राण समजून वागाल? मधमाशांजवळ जपून वागूं तरच मध मिळतो. जर त्यांना दुखवूं तर आपणहि दुखवले जाऊं. मानवी संबंध गुण्यागोविंदाचे मधुर असे राहायला हवे असतील तर प्रेमाचा पहिला शाश्वत कायदा सर्वांनीं पाळलाच पाहिजे. मनुष्य प्रेमाची दुसऱ्यावर सक्ती करूं शकणार नाहीं ही गोष्ट खरी. आपण दुसऱ्याला सक्तीनें काम करायला लावूं शकूं, परंतु सक्तीनें प्रेम करायला कसे लावूं शकूं? ही गोष्ट खरी असली तरी आपण दुसऱ्याजवळ प्रेमानें वागावें. जर दुसऱ्यापासून भलेपणाची आपण इच्छा करीत असूं तर असें प्रेमानें वागणें हा आपला धर्म ठरतो. जर प्रेम करतां येत नसेल तर मानवी समाजांत राहूं नका. जेथें केवळ वस्तू आहेत, व्यक्ती नाहींत अशा जगांत जाऊन राहा. जेथें दगडधोंडे, झाडेंमाडेंच फक्त आहेत तेथें जाऊन वस्ती



करा. भूक असेल तेव्हांच खाल्लें तर अपाय होत नाहीं, त्याप्रमाणें प्रेम कराल तेव्हांच लोकांजवळ तुम्हांला नीट वागतां येईल. मग अपाय होणार नाहीं. माझें जीवन मला हाच धडा शिकवीत आहे. काल मी माझ्या मेव्हण्यांचें मन दुखवलें. मनांत सहानुभूति असती तर मी तसा वागतों ना. जीवनांत जीं अनेक दुःखें भोगावीं लागतात तीं यामुळेंच. प्रतापला एक प्रश्न सुटला असें वाटलें. तापलेल्या सृष्टीवर मेघवृष्टि झाल्यामुळें जसें सर्वत्र हिरवें प्रसन्न नवजीवन आल्याप्रमाणें दिसत होतें, त्याप्रमाणें स्वतःच्या जीवनांतहि नवप्रकाश आला असें त्याला वाटलें.

त्याचे डोळे प्रेमानें फुलले. त्याची मुद्रा प्रेमसागर बनली. तो इतका वेळ खिडकींतून बाहेर बघत होता. तो आतां आंत बघूं लागला. एका म्हाताऱ्याला जागा नव्हती. प्रतापनें आपला कोट जरा आवरून त्याला जागा दिली. तो आधीं बसेना. परंतु प्रतापचें सर्वांजवळचें प्रेमळ निरहंकारी वर्तन पाहून म्हातारा बसला. तो म्हातारा त्या एका शेतकरणीजवळ बोलत होता.



'खरेंच, माझा नवरा चांगला आहे. मी माझी मुलगी घेऊन त्याला भेटायला आलें होतें. परत माघारीं चाललें. किती प्रेमानें त्यानें वागवलें. सारें शहर त्यानें दाखवलें. तो नाहीं पीत दारू, नाहीं विडीचें व्यसन, नाहीं खात सुपारी. या जगांत अशीं माणसें फार थोडीं. माझें नशीब थोर म्हणून असा नवरा मला मिळाला.' ती बाई बोलत होती.

तिची मुलगी तिकडे सूर्यफुलाच्या बिया सोलून खात होती. आई आपल्या बाबांविषयीं



बोलत आहे असें पाहून तिनें सर्वांकडे पाहिलें. आपल्या तेजस्वी डोळ्यांनीं प्रतापकडे पाहिलें.

तेथें एक कामगार होता. तो म्हणाला, ' मी पितों दारू. काय करायचें ? मरेमरेतों काम असतें. कधीं रात्रपाळी, कधीं दिवसपाळी. परंतु मी बायकोला मारीतबिरीत नाहीं. विचारा हिला.'

' खरेंच दादांनो, चांगला वागतो माझा धनी. मीच त्याला कधीं बोलतें. परंतु सारें ऐकून घेतो. कोणाच्या संगतीनें लागलें व्यसन. नाहीं सुटत. काय करतील ? परंतु जपून पितात. पोराबाळांचा विचार ठेवतात. ' ती म्हणाली.

' आणि बाप्पा तुम्ही कोठले ? ' प्रतापनें त्या म्हाताऱ्याला विचारलें.

' पन्नास वर्षें या शहरांत काम करतों आहें. आतां मुलें येथें काम करतात. मी आतां माझ्या गांवीं चाललों. थोडा विसांवा घेईन म्हणतों. शहरांत भगभग. शेवटचे दिवस आपल्या गांवीं जावे. '

प्रताप आतां किसनजवळ बोलत बसला. किसन आपल्या पत्नीचें सारें वृत्त सांगत होता. ती कशी क्षणभर वेड्याप्रमाणें वागली. तिला तुरुंगांतून कशी सोडवून आणली. परंतु पुन्हां सुखानें संसार करूं लागलों तों पोलिसांनीं तिला नेलें आणि आतां काळ्या पाण्याची शिक्षा !

' तुमची बायको, तिच्या मनांत खरें थोडेंच असेल तुम्हांला ठार करायचें ? तसें कोणाच्याच मनांत नसतें. जिवंत प्राण्याला जिवें मारायचें कोण कशाला मनांत आणील ! आमच्या गांवीं एक माळी होता—' अशी गोष्ट एक शेतकरी सुरू करणार तों स्टेशन आलें. गोष्ट तशीच राहिली. प्रताप थोडा वेळ स्टेशनवर उतरला. कोणी बडीं माणसें चढत होतीं. त्यांनीं आपल्याला ओळखूं नये म्हणून प्रताप जपत होता. गाडीची वेळ झाली. तो पुन्हां डब्यांत चढला. डब्यांतील कोणी उतरले होते, कोणी नवीन चढले होते. हा कोण एक आहे ? तो जंगलांतून घरीं जात होता.

' इतकें काम केलें परंतु जातांना दहा रुपयेहि जवळ नाहींत. पांचसहा महिने जंगलांत काम करीत होतों. कॉंट्रॅक्टर काताचा धंदा करी. आम्हीं लांकडें तोडावीं, बारीक करावीं. भट्टी लागायची. जगलांत आम्हांला प्यायला नीट पाणीहि नसे. हिंवताप लागे. कॉंट्रॅक्टर जंगलांतलें तें विषारी पाणी पीत नसे. त्याच्यासाठीं सोडावॉटरच्या बाटल्या असत. परंतु आम्हीं तेंच डबक्यांतील पाणी प्यायचें. एक जण जंगलांतच मेला. काय करायचें? आतां चार महिने काम बंद. पावसाळा आला. जंगलांत लौकर सुरू होतो. दसरादिवाळीनंतर परत जायचें. ' तो हाडकुळा मनुष्य स्वतःची कहाणी सांगत होता.

त्यानें खिशांतून सुपारी काढली. त्यानें प्रतापला दिली. प्रतापनें नाकारली नाहीं. तीं निष्पाप जीवनें, त्या श्रमजीवींच्या कथा त्याला निराळ्याच जगाचें दर्शन घडवीत होत्या. प्रतापविषयीं डब्यांतील लोकांना आपलेपणा वाटला. त्याचा पोशाख नीटनेटका जरा श्रीमंती होता तरी त्याच्या मनमोकळ्या निगर्वी वृत्तीमुळें तो आपल्यांतीलच एक, असें त्या श्रमजीवींना वाटलें. एकानें तर आपली हकीगत सांगतांना प्रतापच्या मांडीवर थाप मारून ' दादा, ती गोष्ट अशी ' असें म्हणून आरंभ केला.

प्रताप मनांत म्हणाला, ' हें निराळेंच जग आहे. हे धट्टेकट्टे लोक, हे साधे कपडे, ह्या घोंगड्या, उन्हातान्हांत काम केलेले ते चेहरे, थकलेले परंतु प्रेमळ नि सहृदय, त्या श्रमजीवनांतील सुखदुःखें, तें खरें अकृत्रिम जीवन, जीवनमरणाचे खरेखुरे प्रश्न—कसें हें जग—नाहींतर तें कृत्रिम श्रीमंती जीवन, तीं खोटीं प्रेमें, तो दंभ, तो आळशी विलास, त्या मेजवान्या, क्लबांवरचे ते वरपांगी वादविवाद, तें जग किती क्षुद्र नि निष्प्राण ! '



# नवजीवन

## ४

त्या एका स्टेशनांत कैद्यांची गाडी थांबली. तेथें दुसरी गाडी यायची होती. तेथील धर्मशाळेंत ते सारे कैदी होते. सभोंवतीं पहारा होता. रूपाकडे कोणी कैदी बघायचे, खडे मारायचे. किसनच्या पत्नीसहि त्रास द्यायचे. परंतु राजकीय स्त्री कैद्यांनीं रूपा, किसनची पत्नी यांना धीर दिला. अरुणा तर नुसती आग होती. ती पोलीस अंमलदारास म्हणाली, ' हे कैदी या रूपाला सतावतात, तुम्हांला दिसत नाहीं ? नाहीं तर ती आमच्याबरोबर इकडे राहूं दे. ' पोलीस अंमलदारानें हरकत नसल्याचें सांगितलें. रूपा त्या राजकीय कैद्यांमध्यें राहूं लागली. राजकीय कैद्यांतहि स्त्री-पुरुष कैदी होते. रूपा त्यांच्या चर्चा ऐके. तिला त्या सर्वांविषयीं अपार आदर वाटूं लागला. स्वतः चांगलें व्हावें असें तिला वाटूं लागलें. इतक्यांत आरडा-ओरड ऐकूं आली. काय होती भानगड ? तो एक बडा अंमलदार रागानें लाल झाला होता.

' स्वतःजवळ त्या मुलीला नको ठेवूं म्हणून सांगितलें होतें कीं नाहीं ? बायको वाटेंत मेली तर काय करायचें ? त्या बायांजवळ दे त्या पोरीला. दे. का मारूं आणखी ठोसा ? पळालास तर आमच्यावर जबाबदारी. '



ती लहान मुलगी रडत होती. आगगाडींत तिची आई उन्हाच्या त्रासानें मरण पावली. ती मुलगी पित्यानें स्वतःजवळ घेतली. परंतु तें करणें कायद्याच्या विरुद्ध. अंमलदाराला तो दुःखी पिता म्हणाला, ' राहूं द्या माझ्याजवळ. ती दुसऱ्या बायांजवळ कशी राहील ? ' तर चुरूचुरू बोलतो म्हणून त्याच्या नाकावर त्यानें ठोसा मारला. पित्याच्या नाकांतून रक्त येत होतें. शिपायांनीं त्या लहान मुलीला स्त्री-कैद्यांजवळ नेऊन दिलें. ती राहीना.

अरुणा तेथें धांवून आली. ती लाल होऊन म्हणाली, ' तुम्ही माणसें कीं राक्षस ? तो कैदी त्या मुलीला घेऊन कोठें पळून जाणार आहे ? बिचाऱ्याची बायको वाटेंत मारलीत. आतां त्या चिमण्या जिवाला त्याच्याजवळ राहूं देत नाहीं. '

' तुम्ही तिकडे चालत्या व्हा. प्रत्येक गोष्टींत तुमची लुडबूड. अजून तुमचें राज्य नाहीं आलें. बसा अंदमानांत. '

' येईल आमचें राज्य. हा सारा जुलूम मग भस्म होईल. म्हणे प्रत्येक गोष्टींत लुडबूड. जेथें जेथें मानवधर्म पायाखालीं तुडवला

जातो, तेथें तेथें आम्ही लुडबूड करणार. आणा त्या मुलीला, मी घेतें ? '

' घ्या. परंतु पुरुष कैद्याजवळ आम्हांला कायद्यानें ठेवतां येणार नाहीं. '

' बापाजवळहि ? '

' बापहि पुरुषच ना ? '

' आग लावा त्या कायद्यांना ! '

' तुमच्या राज्यांत लावा. '

' लावूंच, लावूं. '

अरुणानें ती रडणारी मुलगी जवळ घेतली. परंतु ती थांबेना. तेथें रूपा आली.

' मजजवळ द्या. माझ्या ती ओळखीची आहे. तुरुंगांत मी तिला खेळवीत असें. ' रूपा म्हणाली.

आणि त्या मातृहीन मुलीनें रूपाला ओळखलें. रूपानें तिला जवळ घेतलें, खेळवलें. ती मुलगी रडायची थांबली. रूपानें तिला नेलें, तिला दूध पाजलें. मुलगी हंसूं खेळूं लागली. थोड्या वेळानें रूपाच्या मांडीवर ती निजली. रूपानें तिला निजवलें. आणि उषानें आपली शाल त्या चिमण्या जिवाच्या अंगावर घातली. उषाहि एक राजकीय कैदी होती. गव्हर्नरवर तिनें गोळी झाडली म्हणून तिला सजा. ती उंच सडपातळ होती. ती फार बोलत नसे. परंतु बरोबरच्या एका राजकीय कैद्यावर तिचें प्रेम जडलें होतें. त्याचें नांव दिनकर. दिनकरनें एका गांवीं शेतकऱ्यांचा सत्याग्रह चालवला होता. जमीनदाराचा खून झाला. तो वास्तविक दुसऱ्याच लोकांनीं केला होता. परंतु शेतकरी व त्यांचा म्होरक्या दिनकर यांच्यावर खुनाचा खटला भरला. दिनकरला काळ्या पाण्याची सजा झाली. उषाला दिनकर आवडे. दिनकर गाणीं म्हणूं लागला कीं उषा टाळ्या वाजवी. तीहि ते चरण गुणगुणे. एकदां ती दिनकरला म्हणाली, ' मला द्या तीं गाणीं लिहून. सुंदर गाणीं. '

रूपानें काम हातीं घेतलें. त्या धर्मशाळेंत सर्वत्र घाण होती. तिनें बादल्या भरून आणल्या. फरशी धुवून टाकली. उषा व आणखीहि भगिनी कामाला आल्या.

‘ रूपा, मी येऊं मदतीला ? ’ प्रसन्ननें विचारलें.

‘ तुमचा हात ना दुखतो ? ’ तिनें प्रेमानें प्रश्न केला.

‘ तुझ्याबरोबर काम करतांना नाहीं दुखणार. तुझ्याबरोबर काम करणें म्हणजे अमृत ! ’

‘ तुम्ही तिकडे वाचीत बसा. दुपारीं मला शिकवा मला सारें कळलें पाहिजे, समजलें पाहिजे. ’

‘ पुष्कळ वर्षे राहायचें आहे इकडे. सारे शिकशील, शहाणी होशील ! ’

‘ तुम्ही मला तुच्छ नाहीं समजत ? ’

‘ आम्ही क्रान्तिकारक कोणाला तुच्छ मानीत नाहीं. परिस्थितीमुळें कोणाचें पाऊल कधीं चुकीचें पडतें. म्हणून का कायमचें कोणी वाईट असतें ? ’

‘ किती सुंदर तुमचें बोलणें ! परंतु काम नका येऊं करायला. तुम्ही अशक्त आहांत. ते आले म्हणजे तुमच्यासाठीं टॉनिक पाठवायला मी सांगेन. ’

असें म्हणून रूपा फरशी धुवूं लागली. सारें स्वच्छ झालें.

दुपारच्या वेळेस प्रताप, किसन आले. किसन पोलीस अधिकाऱ्यांना म्हणाला,

‘ मलाहि कैदी करा. माझ्या पत्नीला हे सतावतात. मी कैद्यांमध्यें राहीन, तिचा सांभाळ करीन. ’ त्याची मागणी मान्य करण्यांत आली. त्याच्या पत्नीला आनंद झाला. दोघे कांहीं वर्षें काळ्या पाण्यावर एकत्र राहून पुन्हां घरीं जातील. ‘ आतां जातील चार वर्षें. ’ किसनची पत्नी म्हणाली.

प्रतापच्या नांवें तेथें टपाल आलें होतें. राजाकडे केलेल्या अर्जाचें उत्तर आलें होतें. रूपाची शिक्षा साधी करण्यांत आली होती. रद्द नाहीं झाली तरी साधी झाली. बरें झालें. आतां पुढें काय ? प्रतापला रूपाबरोबर राहतां आलें असतें. किसनप्रमाणें त्याला स्वेच्छा कैदी होतां आलें असतें. रूपाला सक्तमजुरी आतां नव्हती. अंदमानांत लहानशी झोंपडी बांधून दोघें तीन वर्षें राहिलीं असतीं. परंतु रूपा आहे का तयार ?

प्रतापला त्या राजकीय कैद्यांमध्यें जायला परवानगी मिळाली. अरुणा-मुळें रूपाला त्यांच्यांत राहायला मिळालें म्हणून प्रतापला समाधान वाटलें. रूपाच्या चेहऱ्यावर त्याला छचोरपणा दिसत नव्हता. निराळीच रूपा त्याला दिसूं लागली. त्यानें तिच्याकडे पाहिलें. तिनें त्याच्याकडे पाहिलें. एक राजकीय कैदी जरा आजारी होता. त्याला कफ झाला होता. अंगांत ताप होता. त्याचें वय फार नसेल असेल वीस-पंचवीस वर्षांचें. डोळे विलक्षण तेजस्वी होते. जणूं सारी प्राणशक्ति, संकल्पशक्ति त्या डोळ्यांत येऊन संचरली होती. त्याचें नांव रमण.

बाकीची मंडळी जेवायला गेली.

‘ तुम्ही येतां जेवायला ? ’ रूपानें येऊन विचारलें.

‘ मी फळेंच खाणार आहें. या तरुणाजवळ मी बसतों. तुम्ही जा. जेवा सारीं. तूं आनंदांत आहेस रूपा ? ’

‘ हो. ’

‘ मला तुझ्याजवळ बोलायचें आहे. ’

‘ आतां नको बोलणें. बोलायचें अजून काय शिल्लक राहिलें आहे ? ’

‘ मी दिलेला शब्द विसरलों नाहीं. तुझी शिक्षा साधी झाली आहे. आपण एकत्र राहूं शकूं. मीं तुझ्याजवळ विवाह लावीन म्हटलें होतें. तुला आठवतात ना ते शब्द ? ’

‘ मी जातें. ’

ती गेली. प्रताप त्या आजारी तरुणाजवळ बसला. गार वारा सुटला होता. हवेंत मनस्वी गारठा होता. प्रतापनें आपला ओव्हरकोट त्या तरुणाच्या अंगावर घातला.

‘ नको. मला सहन होत नाहीं. बसा जवळ. तुम्ही प्रतिष्ठित दिसतां. परंतु तुमचें हृदय उदार आहे. साऱ्या गोष्टी आम्हांला कळल्या आहेत. तुमची मानवता मेलेली नाहीं हें पाहून आनंद वाटला. तुम्हांला आम्हां राजकीय तरुणांविषयीं प्रेम वाटतें का ? आमच्याविषयीं प्रतिष्ठित श्रीमंत लोकांत नाना प्रकारचे ग्रह असतात. कोणी आम्हांला निरुद्योगी समजतो, कोणी आम्हांला प्रेमभंग झाल्यामुळें निराश होऊन देशभक्तीकडे वळले म्हणतो, कोणी आम्हांला वेडे समजतात, तर कोणी अव्यवहारी मानतात. तुम्ही या

लोकांपैकीं नसाल. आम्ही तरुण क्रांतिकारक कां होतों? परिस्थितिच आम्हांला बनवते. मीच बघा. मी एक विद्यार्थी होतों. विश्वाचें कोडें उलगडावें मला वाटे. विज्ञानाच्या साधनानें विश्वाचा उलगडा होईल का? शोध करावा, शिकावें, प्रयोग करावा असें मनांत येई. एकदां कांहीं विद्यार्थ्यांनीं माझ्याजवळ मदत मागितली. एक गुप्त मंडळ होतें. राजकीय स्वातंत्र्यासाठीं अधिकाऱ्यांचे खून पाडावे, दहशत बसवावी असें मानणारे ते तरुण. मला तो मार्ग पसंत नव्हता. खरें म्हणजे किडासुद्धां मला विश्वशक्तीची अपूर्व कलाकृति वाटे. तो एक लहान किडा! परंतु कोट्यवधि वर्षांचा इतिहास त्याच्या रचनेंत सामावलेला. परंतु त्या विद्यार्थ्यांना लाजेमुळें मी नाहीं म्हणूं शकलों नाहीं. मी भित्रा आहें असें हे म्हणतील असें मनांत येऊन मीं पैसे दिले. पुढें धरपकडी झाल्या. मदत देणारांचीं यादी सांपडली. माझेंहि तिच्यांत नांव होतें. मलाहि अटक झाली. त्या तुरुंगांत अनेक राजकीय कैदी होते. एकेका खोलींत एकेक जण. आम्ही भिंतींवर नाना प्रकारचे आवाज करून एकमेकांस संदेश पाठवीत असूं. कधीं पहारेकरी अनुकूल असला म्हणजे क्रान्तीचीं गाणीं गात असूं. आमच्या त्या रांगेंतच दोन सुकुमार मुलें पकडून आणून ठेवण्यांत आलीं होतीं. खेळकर मुलें. त्यांचा कांहीं अपराध नव्हता. बॉंब तयार करण्याच्या कृतीचीं पुस्तकें म्हणे त्यांच्या खोलींत सांपडलीं. तीं मुलें उत्साहानें उतूं जात होतीं. कधीं त्यांना बाहेर काढीत तेव्हां तीं दिसत. माझ्या खोलीजवळ येत. रात्रीं गाणें गा मला सांगून जात. तो एक मुलगा तर पंधरा सोळा वर्षांचा होता. तोंडावर कोमल लावण्य. डोळे तेजस्वी, खेळकर नि चंचल. नाक कसें होतें. सुंदर, सरळ. ओठ कोवळे लाल. लांब होत. गोरा गोरा पान होता अंगाचा रंग. डोक्यावर काळेभोर केस. तो सुंदर भांग पाडी. जणूं सृष्टीचें तो संगीत होता. दुसरा तरुण थोडा मोठा होता. वृत्तीनें जरा गंभीर होता. परंतु त्याचेंहि वय फार नव्हतें.

एके दिवशीं त्यांना खटल्यावर नेण्यांत आलें. त्यांना म्हणे फांशीची शिक्षा देण्यांत आली. हे न्यायाधिश कीं मांग? पाशवी सत्तेचे लाचार अंमलदार! त्या दोघांना वाटलें कीं ही थट्टा आहे. त्यांना वाटलें कीं फांशीची शिक्षा रद्द होईल.

परंतु एके दिवशीं सुतार आले. त्यांनीं फांशीची चौकट तयार केली. पहारेकरी सांयकाळीं येऊन आम्हांला म्हणाला, ‘ उद्यां त्या दोघांना फांशीं देणार. ’ आम्हां सर्वांना कळली ती बातमी. सर्वत्र निःस्तब्धता होती. रात्रीं ना भिंतीवर टकटक, ना गाणें. त्या दोन तरुणांना तें वातावरण असह्य झालें. ते आपापल्या कोठड्यांतून ओरडून म्हणाले, ‘ अरे, कोणी गाणें गा. असे कां सारे मेल्यासारखे. ’ परंतु त्यांचे ते शब्द ऐकून माझें मन द्रवलें, अति दुःखी झालें. रात्रभर आम्हांला झोंप नाहीं.

पहांटेची वेळ झाली. पांखरें किलबिल करूं लागलीं होतीं. तुरुंगांतील झाडांवरहि थोडेफार पक्षी असत. पहांटेचा जीवनदायी वारा येत होता. लौकरच प्रभात होणार होती, सृष्टींत नवचैतन्य येणार होतें, सूर्य उगवणार होता. अशा वेळेस बुटांचे अनेक आवाज ऐकूं आले.

‘ चला उठा. तुमचा स्वच्छ सदरा घाला. ’ असें त्या तरुणांस सांगण्यांत आलें.

‘ कोठें नेणार आम्हांला ? ’

‘ मग सांगूं. ’

आणि त्या सुंदर सुकुमार किशोरानें स्वच्छ कपडे घातले. तेल लावून त्यानें भांग पाडला. सारें स्वच्छ सुंदर होतें. आणि त्या दोघांना बाहेर काढण्यांत आलें. तो जरा प्रौढ असलेला तरुण माझ्या दाराशीं आला. मी उभा होतों. माझे डोळे सजल होऊं पाहात होते.

‘ सिगारेट द्या. ’ तो म्हणाला.

परंतु त्याच्याबरोबरच्या अधिकाऱ्यानेंच त्याला दिली नि काडी ओढून ती त्यानें शिलगावली. त्या अधिकाऱ्याच्या मुद्रेवर करुणा होती, वेदना होती. त्या तरुणानें ‘ अच्छा, नमस्ते ’ म्हटलें. आणि तो किशोर माझ्या कोठडीजवळ आला.

‘ कोठें नेतात मला ? तुम्हीं रात्रीं गाणें कां नाहीं म्हटलेंत. आज म्हणा हां. मी तें पाठ करीन. छान आहे नाहीं हा सदरा ? हा मला आवडतो ’ तो निर्मळपणें बोलत होता.

‘ चल लौकर ’ कोणी खोटा कठोरपणा वाणींत आणून हुकूम देता झाला.



तो मुलगा गेला. बुटांचे आवाज येत होते. आणि थोड्या वेळानें त्या मुलाचा आरडाओरडा आमच्या कानीं आला. तो समजला सारें. तो निसटून पाहात होता. परंतु बळी घ्यायला काढलेल्या कोंकराला पकडावें तसें त्याला पकडण्यांत आलें. त्याची मान फांसांत अडकवण्यांत आली. खट् खट् आवाज झाले. दोघे लोंबकळले. तो मोठा तर पटकन् प्राणहीन झाला. किशोर धडपडत होता. मांगानें जरा गांठ आवळली. संपलें सारें. तें चैतन्य, ती उत्साहशक्ति, तें सौंदर्य, ती निष्पापता यांचा बळी घेण्यांत आला.

'आणि त्या दिवसापासून मी क्रांतिकारक बनलों. प्रचार करूं लागलों, संघटना करूं लागलों. पोवाडे लिहूं लागलों, पत्रकें वाटूं लागलों. हें भ्रष्ट सरकार आहे. गुलामगिरी लादणारें. मानवता संकटांत आहे. प्रत्येक जिवाचा विकास होईल अशी समाजरचना

हवी. त्या विकासास वाव देईल अशी शासनसंस्था हवी. आम्हांला मूर्ख नका समजूं. आमचीं जीवनें मातींत गाडलीं जात आहेत. परंतु यांतून नवजीवन येईल, नवविकास येईल. आमच्यांत एकमत नाहीं. कोणी अराजक तत्त्वज्ञानाचे पुरस्कर्ते आहेत. कोणी लोकशाही समाजवादाचे. कोणी अहिंसेचे उपासक, तर कोणी साधनांचा विचार न करतां साध्य कसें हस्तगत होईल याचाच विचार करणारे. कोणी हुकुमशाही अपरिहार्य मानतात, तर कोणी म्हणतात तिच्यांतून सत्तेची लालसा असणारे लोक निर्माण होतील. दुधावर साय येते त्याप्रमाणें एक नवीन अधिकारप्रिय वर्ग निर्माण होईल. आपणच सर्वांचे कल्याणकर्ते असें त्यांना वाटेल. विरोधी आवाज सहन करणार नाहींत. कांहींच्या मतें मानवांना हें मुंग्यांप्रमाणें करणें होय. मनुष्याला आत्मा आहे, बुद्धि आहे. त्याला वैचारिक स्वातंत्र्य हवें. व्यक्तीलाहि कांहीं महत्त्व आहे. कोणी म्हणतात एका देशांत समाजवाद अशक्य आहे, तर दुसरे म्हणतात त्या त्या देशांत स्वतंत्र प्रयोग व्हावेत. कोणावर लादूं नये. अनेक मतें आमच्यांत आहेत. आम्ही चर्चा करतों, एकमेकांवर धांवून जातों. परंतु एक गोष्ट खरी की, मतें कोणतींहि असलीं तरी स्वार्थ सर्वांनीं दूर ठेवलेला आहे. सुखावर निखारा ठेवलेला आहे. इतरांना सुख कसें मिळेल, श्रमणारे सुखी कसे होतील, सर्वांना अन्नवस्त्र घरदार कसें मिळेल, सर्वांना ज्ञान-विज्ञान-कला यांतील आनंद कसा मिळेल, सर्वांना विश्रांति कशी मिळेल याचाच ध्यास आम्हां सर्वांना आहे. '

तो तरुण बोलत होता. तो का शेवटचें उपनिषद् गात होता ? तो मध्येंच अर्धवट उठे, पुन्हां उशीवर डोकें ठेवी. त्याची मुद्रा तेजानें नुसती फुलली होती. परंतु बोलण्याच्या श्रमानें घर्मबिंदूंनीं मुख डंवरलें होतें. प्रतापनें आपल्या रुमालानें त्याचें तोंड पुसलें. देवदूताप्रमाणें तो तरुण दिसत होता.

' तुम्ही शांत पडून राहा. तुम्ही उमदे तरुण आहांत. आजारांतून बरे व्हा. मुक्त होऊन या. बद्ध बांधवांना मुक्त करायला दीर्घायु व्हा. ' प्रताप त्याला थोपटीत म्हणाला.

'मी बरा नाहीं होणार. एक दोन दिवस फार तर मी जगेन. माझा आत्मा तुमच्यासमोर मीं ओतला. आम्हां तरुणांबद्दल गैरसमज नका करून घेऊं. आम्ही निरुद्योगी वेडपट नाहीं.' तो तरुण म्हणाला.

तिकडे जेवणें झालीं. एकेकजण येऊं लागला. रूपा, उषा, अरुणा, प्रसन्न, दिनकर वगैरे सर्व मंडळी आली.

'कसा आहे ताप?' अरुणानें विचारलें.

'सारखा बोलत होतास ना?' दिनकरनें प्रश्न केला.

'तो तुमची बाजू मांडीत होता' प्रतापनें सांगितलें.

'आमची बाजू? त्याला काय कळे आमची बाजू? त्याला एकदम क्रान्ति व्हायला हवी आहे. लोकांना समजावलें पाहिजे. त्यांची विचार-शक्ति वाढवली पाहिजे. जोंपर्यंत जनता जाणती होत नाहीं तोंपर्यंत आमच्या क्रान्तींतून हुकुमशहाच निर्माण व्हायचे. माणसें म्हणजे का मडकीं? एखाद्यानें त्यांना थोपटून थोपटून स्वेच्छेनुसार आकार द्यावा? लोकांत जागृति करणें कठिण काम आहे. तें अशा तरुणांना नको असतें. एकदम फांशीं जाणें सोपें असतें. परंतु वर्षांनुवर्षे निराशा गिळून, अपमान, निंदा, टीका सहन करून समाजाची वैचारिक, नैतिक पातळी उंच करण्यासाठीं अहोरात्र झटणें हें मी खरें क्रान्तिकार्य समजतों' प्रसन्न म्हणाला.

'तें कार्य कधीं पुरें होणार महाराज? त्याला युगानुयुगें लागतील. तोंवर का हें रक्तशोषण चालू द्यायचें?' दिनकरनें विचारलें.

'तर का भांडवलदारांना गोळ्या घालणार? सर्वांत सोपा मार्ग म्हणजे विरोधकांना ठार करणें असें तुम्हांस वाटतें.' प्रताप म्हणाला.

'गोळ्या घातल्या म्हणून काय बिघडलें? तुम्हांला तें पाप वाटतें. आम्हांला वाटत नाहीं. हजारों वर्षें कोट्यवधि जीवनें यांनीं मातीमोल केलीं. ती विराट् हिंसा दिसते का तुम्हांला? लाखों लोक भुकेकंगाल, लाखों लोकांना घरदार नाहीं, वस्त्र नाहीं, ज्ञान नाहीं. आणि इकडे अपरंपार चैन. पाणी बाधेल म्हणून सोडावॉटर पीत आहेत! उन्हाळ्यांत थंड हवेच्या ठिकाणीं जात आहेत! ही का अहिंसा? लोकांना इकडे राहायला वीतभर जागा नाहीं. जिन्याखालीं सुद्धां पशूंप्रमाणें माणसें झोंपतात. आणि तिकडे रिकामे बंगले पडले आहेत. नुसतें झकपक फर्निचर तेथें ठेवलेलें.

त्यांच्यावर कुलंगीं कुत्रीं बसतात. हिंसा, अहिंसा, तुम्ही नका शिकवूं आम्हांला. आम्हींहि खूप विचार केला आहे.' दिनकर म्हणाला.

'परंतु शासनसंस्था जाऊन सारा व्यवहार सहकारी पद्धतीनें चालावा असें वाटत असेल तर मानवी मनच सुसंस्कृत नि उदार नको का व्हायला? शासनसंस्था म्हटली कीं थोडा फार अन्याय, हिंसा इत्यादि गोष्टी आल्याच. म्हणून मानवी मन उन्नत व्हावें यासाठीं प्रयत्न करावे असें मला वाटतें. इतिहासांत झटपट रंगाऱ्याचा मार्ग नाहीं. वाटतें आतां रामराज्य येईल, परंतु तें नेहमीं दूरच राहतें. ते ते क्रान्तिवीर श्रद्धेनें, या क्षणीं सुवर्णयुग, सत्ययुग येईल या आशेनें सर्वस्व अर्पायला उभे राहतात. परंतु प्रत्यक्षांत काय दिसतें? फ्रेंच क्रान्तींतून शेवटीं हुकुमशहा नेपोलियन उभा राहातो. कबूल, कांहीं मानवी प्रगति झाली. कांहीं कल्पना जगभर पसरल्या. परंतु विश्वाची प्रगति, मानवी जगाची प्रगति मुंगीच्या पावलानेंच होत आहे. इतिहासाचा हा धडा आहे. तुम्हीं इतिहासाचें विवेचन आर्थिक संबंधांच्या दृष्टीनें केलेंत तरी उद्यां सारे प्रश्न सुटणार आहेत असें मानत असाल तर तुम्ही भ्रमांत आहांत असें मी म्हणेन. इतिहासाची सर्वश्रेष्ठ शिकवण अशी आहे कीं खऱ्या विकासाला जवळचा मार्ग नाहीं. तुम्हांला वाटेल कीं आपण एखाद्या पक्षाची हुकुमशाही स्थापून, सारें प्रचारतंत्र हातीं घेऊन, छापखाने, पुस्तकें, सारें एकरंगी, एका विचाराचें प्रसिद्धून ठराविक नमुन्याचा मानव निर्मू. परंतु ही भूल आहे. मानवाचें मानवशास्त्रच आम्ही बदलूं अशी तुम्हांला घमेंड आहे. आईबापांना पूर्वी देव मानीत, आतां समाजाला देव मानतील असें आम्ही करूं म्हणून म्हणत आहांत. परंतु मला तुमच्या उथळ उत्साहाचें हंसूं येतें. तुमची तळमळ प्रणामार्ह आहे. परंतु तळमळ झाली तरी तीसुद्धां शास्त्रशुद्ध हवी, खोल सत्यावर आधारलेली हवी. आणि मानवी मन हें इतकें सुटसुटीत सोपें नाहीं हें ध्यानांत धरा. कोट्यवधि वर्षें उत्क्रान्त होत आलेलें हें मानवी मन, ग्रहांतून उपग्रहांतून, झाडामाडांतून, पशुपक्षांतून, नाना योनींतून क्रान्त उत्क्रान्त होत आलेला हा मानव आणि त्याचें मन आणि मेंदु, हृदय आणि बुद्धि, या साध्या वस्तु नाहींत. त्याच्या इतर वृत्ति दडपल्यानें त्या कायमच्या दडपल्या जाणार नाहींत. तुम्हांला वाटेल सारें जग आम्हीं सुधारलें. तर पुन्हां केव्हां

सुप्त वृत्ति पेट घेतील, व्यक्तिगत स्वतंत्र भावना वर उफाळेल त्याचा नेम नाहीं म्हणून आम्ही म्हणतों कीं केवळ दडपेगिरीनें सामाजिक, आर्थिक वा राजकीय क्रान्ति करण्याचा प्रयत्न आततायीपणाचा होईल.' प्रसन्न म्हणाला.

'रमण आजारी आहे. पुरे चर्चा.' अरुणा म्हणाली.

'या चर्चा म्हणजे माझें अमृतरसायन.' रमण म्हणाला. परंतु प्रताप उठला. प्रसन्नहि उठला.

'तुमच्याजवळ मला थोडें बोलायचें आहे.' प्रसन्न म्हणाला.

'माझ्याजवळ ?' प्रतापनें विचारलें.

'हो. चला तिकडे.'

दोघे जरा बाजूला गेले. प्रसन्न गंभीर होता. क्षणभर कोणी बोलेना.

'बोला. संकोच नको.' प्रताप म्हणाला.

'मला रूपाविषयीं बोलायचें आहे.'

'रूपा सुखी दिसली. ती सेवापरायण होत आहे. मला किती आनंद झाला. तिच्या डोळयांत निर्मळपणा दिसला.'

'हो. ती सुखी आहे. आणि खरें सांगू का, मला तिच्याविषयीं प्रेम वाटतें. मी लग्न करायचें नाहीं या मताचा. परंतु रूपानें मला जिंकलें. दोन दिवसांचा परिचय. परंतु काय असेल तें असो. दोघांना काळया पाण्याची शिक्षा. दोघांची शिक्षा साधी. आम्ही झोंपडी बांधू. पुढें जगलों वांचलों तर राष्ट्रसेवा करायला येऊं. तुमची संमति हवी.'

'रूपाची शिक्षा साधी झाल्याचें तुम्हांला कळलें वाटतें ?'

'तिनेंच मघां जेवतांना सांगितलें. तुम्हींच तिला ती बातमी दिलीत. आम्ही दोघें जवळजवळ जेवायला बसलों होतों. मित्र थट्टा करतात. तुमचें काय मत ? रूपा मला म्हणाली कीं तुमची संमति हवी.'

'मी कोण संमति देणारा ? हा तिचा प्रश्न आहे. तिला तिचें स्वातंत्र्य आहे. कोठूनहि ती सुखी होवो.'

'तुमची संमति आहे तर ?'

'मी तिच्याजवळ बोलेन. तिलाच जरा इकडे पाठवा.' प्रसन्न गेला. रूपा अरुणाजवळ कांहीं तरी बोलत होती.

'काय रे प्रसन्न, काय ठरलें ?' अरुणानें विचारलें.

'ते रूपाला बोलवीत आहेत' प्रसन्न म्हणाला.

'जा रूपा' अरुणा म्हणाली.

'मी जाऊन काय बोलूं? त्यांच्यासमोर माझी मान खालीं होते. माझ्यासाठीं कां ते इतकें करतात? मी एक सामान्य स्त्री. पतित हीनदीन स्त्री' रूपा दुःखानें म्हणाली.

'रूपा, असें कधीं स्वतःला म्हणत जाऊं नकोस. सर्वांमध्यें दिव्यता आहे. सारे चढणारे व पडणारे. कधीं न पडला असा जगांत कोण आहे? अहंकार कोणासच नको' प्रसन्न म्हणाला.

रूपा प्रतापकडे आली. दोघें मुकीं बसलीं होतीं. रूपानें केस मागें सारले. वारा येऊन पुन्हां बट पुढें येई.

'रूपा' प्रतापनें आरंभ केला.

'काय ?'

'मग तूं काय ठरवलेंस ?'

'प्रसन्न बोलले ना ?'

'तुझी नि त्यांची दोन दिवसांची ओळख.'

'हृदयें क्षणांत अनंत काळचें अनंत बोलूं शकतात. डोळे क्षणांत अपार बघूं शकतात.'

'खरें आहे. तुझें का त्यांच्यावर प्रेम आहे.'

'ते मला आवडतात. दोघांनाहि काळ्या पाण्याची शिक्षा. त्यांचे विचार मला आवडतात. मी शिकेन, चांगली होईन. तुमची संमति द्या.'

'रूपा माझा निश्चय अभंग होता. असें कांहीं होईल अशी मला कल्पना नव्हती. मी नको तर तुला ?'

'तुम्ही माझ्यासाठीं कां हा त्याग करतां? तुम्ही कां मानसिक नि शारीरिक कष्ट सहन करतां ?'

'मला त्रास नाहीं होत. माझ्या उद्धारासाठींच हें सारें आहे. तुझ्या उपयोगी पडावें हीच मला इच्छा.'

'परंतु आम्हांला कशाची जरूरी नाहीं.' आम्हांला असें म्हणतांना क्षणभर ती चमकली. ती बावरली. तिनें वर पाहिलें. पुन्हां ती म्हणाली, 'माझ्यासाठीं तुम्हीं पुष्कळ केलेंत. तुम्ही नसतेत तर......' तिचा कंठ दाटून आला. तिला पुढें बोलवेना.

'रूपा, तुला तरी माझे आभार मानण्याची आवश्यकता नाहीं.'

'हिशेब करण्याची काय जरूर? सारा हिशेब देवाघरीं' ती म्हणाली. तिच्या डोळ्यांत अश्रू चमकले.

'किती ग तूं चांगली.'

'मी चांगली?' स्फुंदत ती म्हणाली. करुण स्मित क्षणभर अश्रूंतून मुखावर आलें नि गेलें.

'जा रूपा. सुखी हो.'

ती गेली. आणि तो क्षणभर तेथें बसला. परंतु एकदम उठला. त्याचे डोळेहि भरून आले होते. परंतु त्यानें ते पुसले. तो बाहेर पडला. त्या धर्मशाळेच्या बाजूनें एक मोटा रस्ता जात होता. त्या रस्त्यानें तो जात होता. पुढें नदी लागली. तेथें का तें स्मशान होतें? आणि तेथें कोण आहे तो बुवा?

'तुम्ही काय करतां येथें? तुम्ही का प्रार्थना करीत होतेत या झाडाखालीं बसून?' प्रतापनें विचारलें.

'कोणाची प्रार्थना?'

'देवाची.'

'कोठें आहे तो देव?'

'आकाशांत.'

'तुम्ही तेथें जाऊन पाहिलांत वाटतें?'

'मीं पाहिला कीं नाहीं हा प्रश्न नाहीं. परंतु सर्वांनीं प्रार्थना करावी.'

'देवाला कोणीं पाहिलें नाहीं. न पाहिलेल्याची प्रार्थना कशी करायची?'

'तुमचा धर्म कोणता?'

'मला धर्म नाहीं. कारण कशावर माझी श्रद्धा नाहीं.'

'कशावरच श्रद्धा नाहीं?'

'माझ्यावर आहे.'

' स्वतःवर ? मग पदोपदीं घसराल, चुकाल. आपण पापी जीव. '

' स्वतःवर विश्वास ठेवायला लागल्यापासूनच मी पडलों नाहीं, पश्चात्ताप करायची पाळी आली नाहीं. आपण दुसऱ्यावर विश्वास ठेवूं लागतों नि नाना धर्म, संप्रदाय, पंथ उत्पन्न होतात. मग मारामाऱ्या, कत्तली. जो तो स्वतःला सत्य मानतो. परंतु अशा अनेक श्रद्धा असल्या तरी आत्मा एक आहे. तो माझ्यांत आहे, तुमच्यांत आहे, सर्वांत आहे. म्हणून आपण स्वतःवर सश्रद्ध राहूं, स्वतःवर विश्वास ठेवूं तर सारे एक होऊं. आत्मस्वातंत्र्य राहूनहि विश्वैक्य अनुभवूं. '

' किती वर्षें झालीं तुम्हांला हें मत स्वीकारून. '

' झालीं पंचवीस वर्षें. परंतु ते मला नास्तिक समजतात. स्वतःच्या आत्म्यावर विश्वास नसणारे मला नास्तिक समजून दगड मारतात. एकदां तर पोलिसांनीं मला पकडलें. म्हणाले, नांव काय तुझें ? परंतु ज्यानें सर्वसंगपरित्याग केला त्याला नांव तरी कसें राहील ? मीं त्यांना म्हटलें मला नांव ना गांव. मी मनुष्य आहें. बस्स. माझें वय विचारीत ! वेडे कुठले. मी कोठें माझें वय मोजीत बसूं ? मी अनादि अनन्त आहें. मी पूर्वीं सदैव होतों, पुढें सदैव असेन. मला म्हणाले तुझे आईबाप कोण ? म्हटलें धरित्री ही माता, विश्वात्मा विश्वंभर माझा पिता. मला म्हणाले राजा मानतोस कीं नाहीं ? मीं म्हटलें तो राजा तसा मी राजा. जो तो स्वतःचा राजा आहे. मला पागल समजून त्यांनीं सोडून दिलें. कोण पागल ? ते कां मी ? '

' आणि तुम्ही कोठें राहतां, कोठें असतां ? '

' हें विश्व माझें घर. पाय नेतील तेथें मी जातों. काम आढळलें तर काम करतों. नसेल काम तर आराम करतों. मला ना आसक्ति, ना बंध. कधीं भिक्षाहि मागतों. '

प्रतापनें खिशांतून नोट काढून त्याच्यापुढें ठेविली. तो भिकारी म्हणाला, ' असली भिक्षा मी स्वीकारीत नसतों. मी भाकरीचा तुकडा कधीं



मागतों. या नोटा, तीं नाणीं त्यांची मला गरज नाहीं. तो बोजा तुमचा तुम्ही ठेवा. '

' क्षमा करा, मला काय माहीत ? '

' क्षमा करण्यासारखें यांत काय आहे ! तुम्हीं कांहीं माझा अपमान नाहीं केलात. आणि माझा अपमान कोण करूं शकेल ! मला कशाचा राग ना लोभ. ना क्रोध ना संताप ' असें म्हणून झोळी खांद्यावर टाकून तो वृद्ध मनुष्य निघून गेला. प्रताप त्याच्याकडे बघत उभा राहिला.

' ही का मुक्त पुरुषाची स्थिति ? ' तो मनांत म्हणाला.

आज रात्रीं दुसरी खास आगगाडी यायची होती. प्रताप त्या धर्मशाळेंत आला. सर्वांची तयारी होत होती. सायंकाळ झाली होती. पहारेकरी फिरत होते. रूपा त्या मातृहीन मुलीला खांद्याशीं धरून निजवीत होती.

' हें पाहा, रमणचा ताप वाढला आहे. तो वातांत आहे. येथील स्थानिक दवाखान्यांत किंवा येथील स्थानिक तुरुंगांत तरी त्याला ठेवतील असें करा. ' अरुणा प्रतापला म्हणाली.



प्रताप रमणजवळ बसला.

'रमण' त्यानें हांक मारली.

तो वातांत होता. 'हीं बलिदानें फुकट नाहीं जाणार. बंधनें तुटतील. घरोघर विकास जाईल. सुखाचा सागर उचंबळेल.' तो म्हणत होता.

प्रतापला अति दुःख झालें. हा तरुण का देवाघरी जाणार? त्याला क्रांतिकारकांविषयीं प्रेम वाटूं लागलें होतें. मनांतील पूर्वीच्या पांढरपेशी अढया नष्ट झाल्या होत्या. तो अधिकाऱ्यांना भेटला. त्यानें त्यांना लांच दिली. काय करणार? शेवटीं स्थानिक दवाखान्यांत त्याला न्यायचें ठरलें.

रात्रीं गाडी आली. रमणला सोडून जातांना सर्वांचे डोळे भरून आले.

'मी राहूं का शुश्रूषेला?' अरुणानें विचारलें.

'निघा. वाटेल तें आतां विचारूं नका. शक्य तें आम्हीं केलें आहे. या सद्‌गृहस्थांना विचारा' बडा अंमलदार म्हणाला.

'रूपा' प्रतापनें हांक मारली.

तिच्या सजल नयनांनीं उत्तर दिलें. परंतु म्हणाली,

'तुम्हीहि सुखी राहा. स्वतःची काळजी घ्या. जगा.'

'सुखी असा. क्षमस्व. आशीर्वाद द्या.' प्रसन्न म्हणाला.

' सुखी व्हा तुम्ही. ' प्रताप म्हणाला.

गेलीं सारीं. घंटा झाली. आगगाडी त्या कैद्यांना घेऊन गेली. प्रताप रमणजवळ येऊन बसला. तेथें हत्यारी पोलीस होते. परंतु स्थानिक दवाखान्याऐवजीं स्थानिक तुरुंगांतच रमणला न्यायचें ठरलें. प्रतापला त्याच्या बरोबर जातां येत नव्हतें. तुरुंगाच्या द्वारापर्यंत तो गेला. रमणला आंत स्ट्रेचरवरून नेण्यांत आलें तुरुंगाचा भयाण दरवाजा लागला. रात्रीचे दहा वाजले होते. ते पाहा टोले पडले. आलबेल सर्वत्र झाली. प्रताप त्या धर्मशाळेंत येऊन पडला. सारें स्वतःचें जीवन त्याच्या डोळ्यांसमोर येत होतें. केवळ स्वतःचेंच नाहीं तर साऱ्या मानवजातीचें जीवन त्याच्यासमोर उभें होतें. जगांतील विषमता, जगांतील प्रतिष्ठित श्रीमंत लोक, जगांतील श्रमणारी दुनिया, आणि हे संघर्ष, हीं बलिदानें, या शिक्षा, हे तुरुंग, हे फांस, हे वाद आणि तो शांत मुक्तात्मा फकीर, सारें त्याच्या डोळ्यांसमोरून चलच्चित्रपटाप्रमाणे जात होते.

सकाळ झाली. तो तुरुंगाच्या दारांत आला. त्याला आंत घेण्यांत आलें. रमणचा आत्मा विश्वात्म्यांत विलीन झाला होता. प्रतापच्या डोळ्यांतून अश्रुधारा आल्या. त्याच्या देहाला मूठमाती देण्याचें त्यानें ठरविलें. अधिकाऱ्यानीं परवानगी दिली. प्रताप गांवांत गेला. त्यानें एक गाडी आणली. तो पुण्यपावन देह त्यानें गाडींत ठेवला. तो त्या स्मशानांत गेला. गांवांतील कांहीं तरुण आले. प्रतापनें नि त्या तरुणांनीं सरण रचलें. अग्नि देण्यांत आला. त्या ज्वालांनीं एक महान् जीवन समाप्त केलें. प्रताप पुन्हां तुरुंगांत आला. त्याला कांहीं लिहून द्यायचें होतें. तेथें बरेच प्रतिष्ठित लोक आले होते.

' ही मंडळी जेल बघायला आली आहे. तुम्हांला बघायचा आहे ? ' जेलरनें विचारलें.

' हो. ' प्रताप म्हणाला.

आणि मंडळी जेल बघत निघाली. त्या एकांतवासाच्या कोठड्या, तें फटके मारायचें तिकाटणें, ती फांशीं देण्याची जागा सारें दाखवण्यांत आलें.

' येथें आठवड्यांतून एकदां धार्मिक प्रवचन होतें ' जेलर म्हणाला.

' छान. ' एक प्रतिष्ठित गृहस्थ म्हणाले.

आणि पुढें गेले. तों तेथें प्रतापला तो कालचा फकीर दिसला.

‘ तुम्ही येथें स्वामीजी ? ’ प्रतापनें विचारलें.

‘ उडाणटप्पू म्हणून मला पकडून आणण्यांत आलें. ’ तो साधु म्हणाला.

‘ उभा राहा. ’ शिपाई म्हणाला.

‘ मी कांहीं कोणाचा नोकर नाहीं उभा राहायला. ’ तो साधु म्हणाला.

‘ सीधा करेगा तुमको ! ’ पोलीस गुरगुरला.

प्रतापला तें सारें पाहून शिसारी आली. हे तुरुंग कीं नरक असें त्याच्या मनांत आलें. सारा दंभ, सारें निर्जीव, निष्प्राण, विवेकहीन काम. रद्दी सरकारें, रद्दी संस्था, रद्दी कारभार. मंडळी ऑफिसांत आली.

‘ मी जातों. ’ प्रताप म्हणाला.

‘ बसा. शेरा लिहा. ’ जेलर म्हणाला.

‘ मी साधा मनुष्य. शेरा ही मंडळी देतील. त्यांना समजतें सारें. अच्छा. नमस्ते. ’ असें म्हणून प्रताप निघाला. तो बाहेर पडला. दिवसभर त्या नदीतीरीं तो भटकत राहिला. रात्रीं एका हॉटेलांत तो आला. एक खोली त्याला देण्यांत आली. त्याला झोंप येत नव्हती. खोलींत तो फेऱ्या घालीत होता. रूपाचा प्रश्न निकालांत निघाला होता. रूपाला आपली जरूर नाहीं हें मनांत येऊन त्याला वाईट वाटलें, लाज वाटली. परंतु दुसरा महान् प्रश्न त्याच्या डोळ्यांसमोर उभा होता. ते तुरुंग, रमणचें तें मरण, जगांतील अन्याय, विषमता ! कसे सोडवायचे हे प्रश्न ?

फेऱ्या घालून तो दमला. तो तेथील खुर्चीत बसला. तेथें दिवा होता. त्याच्या खिशांत धर्म-सार नांवाचें छोटें पुस्तक होतें. जीवनाचे साधे सुंदर नियम तेथें होते.

१. कोणाची हिंसा नको करूं. सारे तुझे भाऊ. जगांत कोणाला हिडीसफिडीस नको करूं. परमेश्वरी अंश सर्वांत आहे. परमेश्वराची प्रार्थना करण्याआधीं कोणाजवळ भांडला असलास तर तें भांडण आधीं मिटवून मग प्रार्थना कर.

२. व्यभिचार नको करूं. कामावर विजय मिळवल्याशिवाय राम नाहीं. एखाद्या स्त्रीवर प्रेम केलें, एखाद्या स्त्रीशीं लग्न लावलेंस तर

तिचा कधीं त्याग नको करूं. तिच्याशीं निष्ठेनें राहा. पराविया नारी मातेसमान मान.

३. सूडबुद्धि मानवाला शोभत नाहीं. अपकाराची फेड उपकारानें कर. सर्वांची सेवा कर. सारें सहन कर.

४. शत्रूंवरहि प्रेम करायला शीक.

अशीं चार सूत्रें त्यांत होतीं. त्यानें तें चिमुकलें पुस्तक मिटलें. त्या चार सूत्रांत त्याला सारें विश्व ब्रह्मांड आढळलें. आजवर जें त्याला अंधुक वाटत होतें तें सारें स्पष्ट झालें. स्पंज पाणी शोषून घेतो त्याप्रमाणें त्याच्या जीवनांतील अन्तर्बाह्य अणुरेणु तो संदेश जणूं ओढून घेत होता. सारें जीवन संस्फूर्त होत होतें.

बगीच्यांत काम करणाऱ्यांना वाटतें हीं फळें-फुलें आमचीं. परंतु ती चूक असते. तीं फळेंफुलें धन्याचीं असतात. त्याप्रमाणें आपलीं जीवनें आपलीं नाहींत. ती ठेव आहे. प्रभूची ठेव. जीवनाचा मळा पिकवून तेथें प्रेम, स्नेह, सहानुभूति यांचीं फुलेंफळें पिकवून तें पीक प्रभूच्या, त्या विश्वंभराच्या चरणीं समर्पावयाचें. प्रतापला वाटलें, ' एक जीवन संपलें. नवजीवन सुरू झालें. ' त्याला मोकळें वाटलें. हृदयावरचा बोजा उतरल्यासारखें वाटलें. त्यानें भक्तिभावानें प्रणाम केला नि म्हणाला,

" प्रभो, तूं माझा सांगाती हो
केला पण चालवी माझा. "



वि. स. खांडेकर यांनीं मुद्दाम मुलांच्या वाचनासाठीं संपादित केलेलीं व देशमुख आणि कंपनीनें प्रकाशित केलेलीं, आणि मुंबई प्रांतिक दुय्यम शाळा खात्यानें पुरवणी-वाचनासाठीं मंजूर केलेलीं

## दहा शालेय प्रकाशनें

१ **काव्यज्योति** N. S. 66-B. S. 1949/L. 425 किंमत सव्वा रुपया.

नामांकित कवींच्या एकूण सत्तावीस कविता या संग्रहांत आहेत. कविता निवडतांना हें पुस्तक शालेय व्हावें आणि प्रत्येक कवीची चांगली कविता त्यांत यावी अशी दक्षता घेतलेली आहे. प्रत्येक कवितेला श्री. वि. स. खांडेकर यांनीं परिचय लिहिलेला आहे.

२ **नवे किरण** N. S. 66-B. S. 1949/L. 433 किंमत सव्वा रुपया.

काणेकरांच्या वीस निवडक लघु-निबंधांचा हा संग्रह श्री. वि. स. खांडेकरांनीं संपादित केला असून, दुय्यम शाळांतल्या वरच्या वर्गांतल्या विद्यार्थ्यांना स्थूल वाचनाला उपयुक्त व्हावा म्हणून त्यांनीं प्रत्येक निबंधाला परिचय व अभ्यास जोडला आहे. शिवाय खांडेकरांची सोळा पृष्ठांची प्रस्तावना.

३ **मुक्या कळ्या** N. S. 66-B. S. 1949/L. 425 किंमत सव्वा रुपया.

कवठेकरांच्या सात गोष्टींचा संग्रह. संपादक : वि. स. खांडेकर. ' नवे

किरण 'प्रमाणें हा संग्रहहि अभ्यास, परिचय व प्रस्तावना यांची जोड देऊन विद्यार्थ्यांना उपयुक्त व्हावा अशा रीतीनें खांडेकरांनीं संपादित केला आहे.

**४ अग्निनृत्य** N. S. 66-B. S. 1949/L. 426 किंमत सव्वा रुपया.

कै. शिवरामपंत परांजपे यांच्या तेजस्वी वाङ्मयांतून श्री. खांडेकरांनीं आठ निवडक लेखांचें हें पुस्तक विद्यार्थ्यांसाठीं संपादन केलें आहे. खांडेकरांनीं पुस्तकाला प्रास्ताविक व प्रत्येक लेखाला परिचय लिहिला आहे. त्यामुळें शिवरामपंतांच्या लिखाणाचे सर्व विशेष विद्यार्थ्यांच्या लक्षांत येतील.

**५ गुदगुल्या** N. S. 66-B. S. 1949/L. 434 किंमत सव्वा रुपया.

कोल्हटकर-गडकऱ्यांनीं मराठी वाङ्मयांत स्वतंत्र विनोदाची प्रभावी परंपरा सुरू केली. या परंपरेचा विकास चिंतामणराव जोशी यांच्या विनोदांत आढळून येतो त्यांच्या विविध व विपुल लिखाणांतून निवडलेल्या या सहा विनोदी प्रकरणांत, त्यांच्या प्रतिभेचे सर्व पैलू प्रगट झाले आहेत. खांडेकरांची वीस पृष्ठांची प्रस्तावना, परिचय व अभ्यास यांची जोड.

**६ इंद्रधनुष्य** N. S. 66-B. S. 1949/L. 427 किंमत सव्वा रुपया.

लघुकथा हा मराठी वाङ्मयांत गेल्या पंचवीस वर्षांत विशेष विकास पावलेला व अधिक लोकप्रिय झालेला वाङ्मयप्रकार आहे. त्याच्या विकासाची अंशतः कल्पना आणून देणारा प्रातिनिधिक कथासंग्रह. हरिभाऊ आपटे, दिवाकर कृष्ण, वि. स. सुखटणकर, य. गो. जोशी, लक्ष्मणराव सरदेसाई, वामन चोरघडे इत्यादि प्रसिद्ध कथालेखकांच्या सात वैशिष्ट्यपूर्ण गोष्टी. खांडेकरांची विस्तृत प्रस्तावना. शिवाय परिचय व अभ्यास.

**७ तारका** N. S. 66-B. S. 1950/L. 543 किंमत सव्वा रुपया.

ज्ञानेश्वरांपासून मर्ढेकरांपर्यंतच्या पंचवीस प्रतिभावान कवि-कवयित्रींच्या वैशिष्ट्यपूर्ण कवितांचा संग्रह. प्राचीन व अर्वाचीन मराठी कवितेचे प्रमुख विशेष विद्यार्थ्यांना सहजासहजीं कळावेत, प्रत्येक कवीच्या प्रतिभेचें वैशिष्ट्य त्याच्या कवितेवरून त्यांना प्रचीत व्हावें आणि श्रेष्ठ काव्यांत जी उदात्त, संजीवक शक्ति असते तिचा लाभ त्यांना व्हावा अशीच या संग्रहाची रचना

आहे. खांडेकरांची १९ पृष्ठांची विवेचक प्रस्तावना. प्रत्येक कवितेला परिचय व अभ्यास यांची जोड.

**८ वासंतिका** N. S. 66-B. S. 1950/L. 542 किंमत सव्वा रुपया.

निवडक लघुनिबंधांचा प्रातिनिधिक संग्रह. फडके-काणेकरांसारख्या गाजलेल्या लघुनिबंधकारांपासून बोरकर-शिरवाडकरांसारख्या वैशिष्ट्ययुक्त लघुनिबंध-लेखन करणाऱ्या लेखकांपर्यंत पंधरा प्रमुख साहित्यिकांच्या लघुनिबंधांचा या पुस्तकांत समावेश केला आहे. विषय, मांडणी, भाषाशैली इत्यादिकांचें वैचित्र्य हा या संग्रहाचा विशेष आहे. हा संग्रह खांडेकरांनीं संपादित केला असून लघुनिबंध या वाङ्मय-प्रकाराचें सुबोध व सोदाहरण विवेचन करणारी वीस पृष्ठांची प्रस्तावना त्यांनीं लिहिली आहे. प्रत्येक लघुनिबंधाला परिचय व अभ्यास यांची जोड देण्यांत आली आहे.

**९ आस्तिक** (संक्षिप्त आवृत्ति) N. S. 66-B. S. 1950/L. 544 किं. १॥रु.

'आस्तिक' ही सानेगुरुजींची सर्वश्रेष्ठ कादंबरी. त्यांचें काव्य आणि तत्त्वज्ञान हीं दोन्ही या कादंबरींत उत्कटतेनें आणि समरसतेनें प्रगट झालीं आहेत. या सरस कादंबरीची संक्षिप्त आवृत्ति वि. स. खांडेकर यांनीं तयार केली आहे. हा संक्षेप सर्वस्वीं सानेगुरुजींच्या शब्दांतच केला असल्यामुळें मूळ कादंबरीइतकाच तो सुंदर वठला आहे. सानेगुरुजींचें व्यक्तित्व, त्यांचें साहित्य व 'आस्तिक' कादंबरी यांची चर्चा करणारी खांडेकरांची वीस पृष्ठांची प्रस्तावना. शेवटीं कादंबरीच्या रसग्रहणाला पोषक असे विविध प्रकारचे चाळीस प्रश्न जोडण्यांत आले आहेत.

**१० रंगदेवता** किंमत सव्वा रुपया.

किर्लोस्कर, आगरकर, देवल, कोल्हटकर व खाडिलकर या पांच नाटककारांचे गुणविशेष दर्शविणाऱ्या सहा सुंदर नाट्यप्रवेशांचा संग्रह. खांडेकरांची सविस्तर प्रस्तावना. शिवाय प्रत्येक नाट्यप्रवेशाच्या आरंभीं त्याचा विस्तृत परिचय व शेवटीं मार्गदर्शक अभ्यास.

●●●